# A
# MARATHA TREATISE
on
# ARITHMETIC
2nd Part




Translated by

Captain George Jervis Engineers

BOMBAY
Printed at the Lithographic Press
of the
Bombay Native School Book
and School Society
1826

F. W. Goodman's Lithography, from
C. Hullmandel's Establishment, London.

# गणित मार्ग.

या मूळ पुस्तकाचा कवि अज्जम डांकतर हट्टन त्या पुस्तकाचें भाषांतर जार्ज जार्विस साहेब इंजनेर सर्कार इंग्रेज बाहादुर मुंबई यांणी जगन्नाथ शास्त्री क्रमवंत यांचे साहाय्यानें महाराष्ट्र भाषेंत केलें.

---


मुंबई

शके १७४८

इंग्रेजी संन १८२६

हें पुस्तक छापण्याची ही प्रथमावृत्ती. बापू गंगाधर जोशी चिपळोणकर यांचे हातानें लिहवून दगडावर छापिली.


---

हा अपूर्णांक गणित मार्ग महाराष्ट्र भाषेंत दाखवितो यांत कित्येक पदार्थांचीं नावें या भाषेत अप्रसिद्ध आहेत तीं प्रायशः संस्कृत शब्देंकरूनच लिहिलीं आहेत व या मुलकाचे व्यवहारांत अनेक भाषांचे शब्द येतात परंतु बहुत करून महाराष्ट्र शब्द च लिहितो.

या

या गणिताचे दुसरें अपूर्णांक भागांतील प्रकरणांची अनुक्रमणिका.

श्री

## कार्यप्रकाशक चिन्हें.

गणित आणि बीजगणित यामध्यें कित्येक कामांचीं प्रकाशक ह्मणजे दाखविणारीं चिन्हें आहेत तीं लिहितो.

+ हें चिन्ह अधिक करण्याचें ह्मणजे मेळविण्याचें.

— हें उणें करण्याचें ह्मणजे वजा करण्याचें.

× हें गुणण्याचें.

÷ हें भागण्याचें.

: :: : हें राशिगणित करण्याचें.

= हें ह्मणजे शब्दाचें. किंवा बराबर

√ हें वर्गमूळ करण्याचें.

∛ हें त्रिघनमूळ करण्याचें.

## यांचीं उपयोगस्थळें.

५ + ३ यांत ५ आणि ३ यांची मेळवणी करावी. असें मध्यचिन्ह दाखवितें.

६ — २ यांत ६ तून २ उणे करावे. ह्मणजे साहांत

हांत दोन वजा करावे·

$७ \times ३$ यांत सातानीं तीन गुणावे· हें मध्य चिन्ह दाखवितें·

$८ \div ४$ यांत आठ चोहोनीं भागावे· असें मध्यचिन्ह दाखवितें·

$२:३::४:६$ यांत जसे दोन तिहींस· तसे चार साहांस·

$७^{२}$ यांत सातांचा वर्ग करावा हें तो वरचा अंक दाखवितो·

$८^{३}$ यांत आठांचा घन करावा· हें तो वरचा अंक दाखवितो·

$\sqrt{३}$ किंवा $३^{\frac{१}{२}}$ यांत तिहींचें वर्गमूळ करावें·

$\sqrt[३]{५}$ किंवा $५^{\frac{१}{३}}$ यांत पांचांचें घनमूळ करावें·

## व्यवहारी अपूर्णांक ·

याच्या पूर्वीं पूर्णांकांचा गणितमार्ग लिहिला· परंतु सर्वत्र पूर्णांकगणितानींच निर्वाह होत नाहीं याजकरितां अपूर्णांक गणिताचा मार्ग दाखवितो ·

जे अंक एक सगळ्ये वस्तूचे किंवा संख्येचे एक किंवा अनेक अवयव हें दाखवितात· त्यांस अपूर्णांक ह्मणतात· त्या वस्तूचे किती अवयव तें या दोनअंकांपासून कळतें·

अपूर्णांक ह्मणजे भाग=तुकडा जसें १ वस्तूचे ५ तुकडे करून त्यांतून जो १ तुकडा त्यास १ पंचमांश ह्मणतात· तो १ पंचमांश लिहिण्याचा संप्रदाय असा· किं· प्रथम वर १ त्याचेखालीं—अशी रेघ आणि त्या रेघेखालीं ५ लिहून असें $\frac{१ \text{ अंश}}{५ \text{ छेद}}$ ह्मणजे हा १ पंचमांश जाहाला· तसें कोण्ये वस्तूचे ३६५ भाग करून त्यांतून ३० भाग घेणें तर प्रथम वर ३०

त्याचे

त्याचे खालीं—रेघ त्याचे खाली ३६५ मिळून असें $\frac{३०}{३६५}$ अंश/छेद ह्मणजे ३६५ भागांतून ३० भाग जाहाले. याप्रमाणें सगळेय वस्तूचे बरोबर किती अवयव करायाचे तें छेद ह्मणजे रेघे खालचा अंक दाखविनो. आणि हे छेद भागाकारांत भाजकस्थळीं होतात.

अंश ह्मणजे रेघेवरचे अंक ते छेदांतून ह्मणजे रेघेखालचे अंकांतून किती घ्यावयाचे तें दाखवितात. आणि भागाकारांत वजा बाकी दाखवितात.

आणि त्या दोन संख्यांस अपूर्णांकाचीं पदें ह्मणतात.

हें अपूर्णांक गणित व्यवहारांत फार लोक घेतात ह्मोटें उपयोगी आहे व याच्या रीती बहुतप्रकारच्या आहेत. त्यांत वर लिहिल्ये रीतीचें नांव सर्वांस समजावें ह्मणून लिहितो. किं यारीतीस व्यवहारी अपूर्णांकगणितरीती असें ह्मणावें.

या अपूर्णांकांत जाती ५ आहेत· अशाकि· सम· विषम· भागजाती· प्रभागजाती· आणि भागानुबंधपूर्णांक·

जेव्हां अंश छेदांहून उणे आहेत तेव्हां त्यांस समअपूर्णांक ह्मणतात· जसें $\frac{१}{२}$ अथवा $\frac{२}{३}$ अथवा $\frac{३}{५}$

जेव्हां अंश छेदांचे बराबर अथवा अधिक आहेत तेव्हां त्यांस विषमअपूर्णांक ह्मणतात· जसें $\frac{३}{३}$ अथवा $\frac{५}{४}$ अथवा $\frac{६}{५}$

जेव्हां केवळ अपूर्णांकच आहे जो एके सगळ्ये वस्तूचा तुकडा तेव्हां त्यास भागजाति अपूर्णांक ह्मणतात· जसें $\frac{२}{३}$ अथवा $\frac{३}{२}$

जेव्हां अपूर्णांकाचा तुकडा अथवा बहुत अंक जांचे मध्यें चा लिहिला आहे त्याचा अंश त्यास प्रभागजाति अपूर्णांक ह्मणतात· जसें $\frac{२}{३}$ चा $\frac{१}{२}$ अथवा ३ चे $\frac{५}{६}$ चे $\frac{३}{५}$

जेव्हां पूर्णांक लिहून पुढें त्याजवळच अपूर्णांक लिहिले तेव्हां त्यांस भागानुबंधपू-

र्णांक

र्णांक ह्मणतात. जसें ३ $\frac{१}{२}$ अथवा १५ $\frac{३}{४}$ अथवा २१ $\frac{७}{१२}$

पूर्णांकसंख्येस अपूर्णांकाचें रूप देउं सकतात. पूर्णांकसंख्येखालीं छेदस्थळीं १ लिहावा जसें ३ याखालीं रेघ फाडून खालीं १ लिहावा. ह्मणजे $\frac{३}{१}$ अथवा यांस $\frac{६}{१}$

अपूर्णांक भागाकार सूचवितात. आणि त्यांचें वजन. अंश छेदानीं भागून जो भागाकार येतो त्याचे बराबर आहे. जसें $\frac{१२}{४}$ यांचें वजन ३ आहेत. आणि $\frac{२१}{५}$ यांचें वजन ह्मणजे किमत ४ $\frac{१}{५}$ याचे बराबर आहे.

यावरून जर अंश छेदांहून उणे आहेत तर अपूर्णांकांची किमत १ हून उणी आहे. परंतु जर अंश छेदांबराबर आहेत तर अपूर्णांकांची किमत बराबर केवळ १ आहे. आणि जर अंश छेदांहून अधिक आहेत तर अपूर्णांकांची किमत १ हून अधिक आहे.

व्यवहारी

## व्यवहारी अपूर्णांकाची भांजणी

व्यवहारी अपूर्णांकाची भांजणी ह्मणजे रूपाचा बदल करणें. ही भांजणी वजाबाकी व दुसऱ्येही गणितांत बहुत लागत्ये. याजकरितां ईचा रीती ह्मणजे प्रकार बहुत आहेत. त्या पुढें सांगेल.

### कृत्य.

### दृढभाजक.

दृढभाजक ह्मणजे अनेक रकमा आहेत त्या एका अंकानें निःशेष भागल्या जातात. त्या एका अंकास दृढभाजक ह्मणतात. तो काढण्याची रीती.

जेव्हां २ रकमा आहेत तेव्हां त्यांत जी मोटी रकम असेल ती लाहान रकमेनें भागावी. आणि बाकी राहील तो भाजक कल्पून ती लाहान रकम भागावी. जी बाकी राहील तो भाजक आणि पूर्वभाजक तो भाज्य असें कल्पून त्याणें तो भागावा. याप्रमाणें

णें बाकी ० पर्यंत करावें· शेवटील जो भाजक ह्मणजे ज्या भाजकानें भागतां भाज्य निःशेष आलें· तो दृढभाजक जाणावा· रीती·

जेव्हां ३ किंवा ४ रकमा आहेत तेव्हां जो २ रकमांचा दृढभाजक आला असेल त्याणें तिसरी रकम वर सांगीतल्याप्रमाणें भागावी· शेवटीं ज्या भाजकानें शेवटील भाज्य निःशेष भागला जाईल· तो त्या रकमांचा दृढभाजक ह्मणावा·

कदाचित् भाजकानें भागतां भाज्याचा एकच बाकी राहिला तर त्या रकमांचा दृढभाजक नियत नाहीं ह्मणोन जाणावें·

## उदाहरणें·

प्रथम उदाहरण· २४६ आणि ३७२ या दोन रकमांचा दृढभाजक कोण तो सांग·

```
२४६)३७२(
    २४६
    १२६)२४६
        १२६
        १२०)१२६
            १२०
              ६)१२०
                 २०
```

या २ रकमांत लाहा न रकम आहे ती भाजक आणि मोठी रक्कम भाज्य असें लिहि. नंतर भाग. बाकी १२६ राहिले त्याणीं पूर्व भाजक २४६ ते भाज्य कल्पून भाग. बाकी १२० राहिले ते भाजक त्याणीं पूर्वभाजक १२६ तेभाज्यकल्पून भाग. बाकी ६ राहिले ते भाजक त्याणीं पूर्व भाजक १२० ते भाज्य कल्पून भाग. बाकी० तेव्हां शेवटील भाजक ६ यांस दृढभाजक ह्मणावे. त्याणीं दोनीं रकमा निःशेष भागल्याजातात.

दुसरें. २१६ आणि २८८ यांचा दृढभाजक कोण तो सांग.

उत्तर ७२ दृढभाजक.

तिसरें. ३२४ आणि ६१२ यांचा दृढभाजक कोण तो सांग.

उत्तर ३६ दृढभाजक.

चवथें

क कोण तो सांग·

उत्तर १०५

पांचवें· १९५ आणि ७८० यांचा दृढभाजक कोण तो सांग·

उत्तर १९५

साहावें· ३२४ आणि १०३२ यांचा दृढभाजक कोण तो सांग·

उत्तर १२

सातवें· ६३० आणि ९३६ यांचा दृढभाजक कोण तो सांग·

उत्तर १८

## तीन रकमांचीं उदाहरणें·

प्रथम· ९३६ · १९०८ आणि ६३० यांचा दृढभाजक कोण तो सांग·

उत्तर १८

दुसरें· ३२४ · ६१२ आणि १०३२ यांचा दृढभाजक कोण तो सांग·

उत्तर

उत्तर १२

---

## प्रथम प्रकार·

## अपूर्णांक संक्षेप·

व्यवहारी अपूर्णांकांचा संक्षेप करावयाची रीती· पूर्व रीती प्रमाणें छेद व अंश यांचा दृढभाजक काढावा· नंतर त्याणें ते छेद व अंश भागावे· जो भागाकार येईल तो संक्षेप· छेदांचा भागाकार छेदस्थळीं मांडावा· हा छेदसंक्षेप त्या छेदांचे बरावर किमतीचा होय· तसा अंशांचा भागाकार अंशस्थळीं मांडावा· हा अंशसंक्षेप· त्या अंशांचे बरावर किमतीचा होय·

## उदाहरणें·

प्रथम· $\frac{२१६}{२८८}$ यांचा संक्षेप काय होतो तो सांग·

$\frac{२१६}{२८८}$ $\frac{३}{४}$ यांचा दृढभाजक ७२ त्याणें २१६ अंश भाग· भागाकार ३ आले ते

अंश

अंशस्थळीं लिहि. नंतर ७२ या दृढभाजकानें २८८ छेद भाग. भागाकार ४ आलेते छेदस्थळीं लिहि.
$\frac{२१६}{२८८}$ हे अपूर्णांक व $\frac{३}{४}$ हाअपूर्णांक संक्षेप हेदोनी बराबर किमतीचे होत.

दुसरें. $\frac{१९५}{७८०}$ यांचा संक्षेप काय होतो तो सांग.

उत्तर $\frac{१}{४}$

तिसरे. $\frac{१५६}{२०८}$ यांचा संक्षेप काय होतो तो सांग.

उत्तर $\frac{३}{४}$

चवथें. $\frac{५२५}{६३०}$ यांचा संक्षेप काय होतो तो सांग.

उत्तर $\frac{५}{६}$

---

## दुसरा प्रकार.
## विषम अपूर्णांक रूप.

भागानुबंधपूर्णांकास विषमअपूर्णांकांचें

## त्याची रीती·

एके रकमेंत पूर्णांक आणि व्यवहारी अपूर्णांक ऐसे आहेत· त्यांस भागानुबंधपूर्णांक ह्मणावे· जेथें छेद थोडे आणि अंश बहुत त्यांस विषम अपूर्णांक ह्मणावे· पूर्णांकास अपूर्णांकछेदानीं गुणावें· आणि त्यांत अंश मिळवावे· जीबेरीज होईल त्याचेखालीं रेघ फाडावी· आणि त्या रेघेखालीं तो छेदांक लिहावा· ह्मणजे इतके हे विषम अपूर्णांक त्या भागानुबंधपूर्णांकांचे बराबर किमतीचे होत·

## उदाहरणें·

प्रथम· $२३\frac{२}{५}$ या भागानुबंधपूर्णांकास विषमअपूर्णांकांचे बराबर किमतीचें रूपदे·

$२३\frac{२}{५} = \frac{११७}{५}$ पूर्णांक २३ ते ५ छेदानीं गुण

$२३ \times ५ = ११५ + २ = ११७$

याचेखालीं छेदांक ५ लिहि·

ह्मणजे हे त्यांचे बराबर कि-

मतीचे



मतीचे होत.

दुसरें. $१२\frac{७}{९}$ याभागानुबंधपूर्णांकास वि विषम अपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर $\frac{११५}{९}$

तिसरें. $१४\frac{७}{१०}$ याभागानुबंधपूर्णांकास वि षम अपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर $\frac{१४७}{१०}$

चवथें. $१८३\frac{५}{२१}$ याभागानुबंधपूर्णांकास अपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर $\frac{३८४८}{२१}$

---

## तिसरा प्रकार.

विषम अपूर्णांकास पूर्णांकांचें अथवा भागानुबंधपूर्णांकांचें रूप द्यावयाचा.

त्याची रीती.

अंशांक छेदांकानी भागावे. भागाकार येईल तो पूर्णांक जाणावा. बाकी राहील ते व्यवहारीअपूर्णांक जाणावे.

उदाहरणें

प्रथम $\frac{१२}{३}$ याविषमअपूर्णांकास पूर्णांकांचें रूप दे.

उत्तर ४

दुसरें $\frac{१५}{७}$ या विषम अपूर्णांकास भागानुबंधपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर २ $\frac{१}{७}$

तिसरें $\frac{७४९}{१७}$ या विषम अपूर्णांकास भागानुबंधपूर्णांकांचें रूपदे.

उत्तर ४४ $\frac{१}{१७}$

चवथें $\frac{५६}{७}$ या विषम अपूर्णांकास पूर्णांकांचें रूप दे.

उत्तर ८

पांचवें $\frac{१३६२}{२५}$ या विषम अपूर्णांकास भागानुबंधपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर ५४ $\frac{१२}{२५}$

साहावें $\frac{२९१८}{१७}$ या विषम अपूर्णांकास भागानुबंधपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर १७१ $\frac{११}{१७}$

## चौथा प्रकार·

## अपूर्णांक रूप·

कोणी एक पूर्णांकास कोणी सांगीतले तितके छेद करावयाकरितां बराबर किमतीचें अपूर्णांकांचें रूप द्यावयाचा·

### त्याची रीती·

जितके छेद करावयाचें त्या अंकानीं पूर्णांक गुणावा· आणि त्या गुणाकाराखालीं तो गुणक छेदांक लिहावा·

### उदाहरणें·

प्रथम· ९ या पूर्णांकास अपूर्णांकांचें रूप दे· असें कीं छेदस्थळीं ७ होतील· आणि किमत बराबर होईल·

$९ \times ७ = ६३ \div ७ = ९$ हाताळा $\frac{६३}{७}$

दुसरें· १२ या पूर्णांकास अपूर्णांकांचें रूप दे· असें कीं छेदस्थळीं १३ होतील·

उत्तर $\frac{१५६}{१३}$

तिसरें· २७ या पूर्णांकास अपूर्णांकाचें

रूप

रूप दे. असें कीं छेदस्थळीं ११ होतील.

उत्तर $\frac{२८७}{११}$

चवथें ३२ यापूर्णांकास बराबर किमतीचें अपूर्णांकांचें रूप दे. असें कीं छेदस्थळीं १५ होतील.

उत्तर $\frac{४८०}{१५}$

पांचवें. ४० यापूर्णांकास बराबर किमतीचें अपूर्णांकांचें रूप दे. असें कीं छेदस्थळीं २० होतील.

उत्तर $\frac{८००}{२०}$

## पांचवा प्रकार.

प्रभागजाति अपूर्णांकास भागजातिअपूर्णांकांचे बराबर किमतीचें रूप द्यावयाचा.

त्याचीरीति.

अंशांचेअंश अथवा त्यांचे अंश अशांस प्रभागजातिअपूर्णांक ह्मणावे. आणि अंशांस भागजातिअपूर्णांक ह्मणावे.

सर्वअंश परस्पर गुणावे. जोगुणाकार

होईल

लिहावा. तसे सर्व छेद परस्पर गुणावे.
गुणाकार येईलतो भागजातिअपूर्णांक
स्थळीं लिहावा.

प्रभागजाति अपूर्णांकामध्यें जर भा
बंधपूर्णांक असेल तर त्यास पूर्वगतीनें
षमअपूर्णांकाचें रूप द्यावें.

जर अंशांचेओळींतला अंक छेदां
ळींत आहे. किंवा छेदांचे ओळींतला अं
अंशांचे ओळींत आहे. तर ते दोनी छेकू
त्यात्या ओळींत नाहींत असें समजावें.
अंशानें छेदांक बराबर भागला जातो किं
छेदांकानें अंशांक. तर तो भागून ते दोनी
ज्य आणि भाजक हे छेकून त्यास्थळीं
त असें समजावें. आणि जो भागाकार
ला असेल. तो छेकल्ये भाज्यांकावर मांडा
त्यास्थळीं तो आहे असें समजावें.

उदाहर

## उदाहरणे.

प्रथम $\frac{३}{४}$ चे $\frac{२}{३}$ चा $\frac{१}{२}$ हे प्रभागजातिअपूर्णांक आहेत. यांस बराबरकिमतीचें भागजातिअपूर्णांकांचें रूप दे.

$$\frac{३ \times २ \times १}{४ \times ३ \times २} = \frac{६}{२४} \text{ यांचा संक्षेप } \frac{१}{४}$$

$$\text{संक्षेपरीती } \frac{३ \times २ \times १}{४ \times ३ \times २} = \frac{१}{४}$$




दुसरें $\frac{१०}{११}$ चे $\frac{३}{५}$ चे $\frac{२}{३}$ हे प्रभागजातिअपूर्णांक आहेत. यांस बराबरकिमतीचें भागजातिअपूर्णांकांचें रूप दे.

$$\frac{१० \times ३ \times २}{११ \times ५ \times ३} = \frac{६०}{१६५} \text{ यांचा संक्षेप } = \frac{४}{११}$$

$$\text{संक्षेपरीती } \frac{१० \times ३ \times २}{११ \times ५ \times ३} = \frac{४}{११}$$

तिसरें $\frac{४}{८}$ चे $\frac{३}{७}$ हे प्रभागजातिअपूर्णांक आहेत. यांस बराबरकिमतीचें भागजातिअपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर $\frac{१२}{५६}$

चवथें $\frac{५}{९}$ चे $\frac{३}{८}$ चे $\frac{२}{३}$ हे प्रभागजातिअपूर्णांक आहेत. यांस बराबरकिमतीचें भाग-

जाति

जातिअपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर $\frac{२}{०}$

पांचवें $३\frac{१}{२}$ चे $\frac{५}{८}$ चे $\frac{२}{५}$ हे प्रभागजातिअपूर्णांक आहेत. यांस बराबरकिमतीचें भागजातिअपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर $\frac{७}{८}$

साहावें ४ चे $३\frac{१}{२}$ चे $\frac{५}{८}$ चे $\frac{२}{७}$ हे प्रभागजातिअपूर्णांक आहेत. यांस बराबरकिमतीचें भागजातिअपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर $२\frac{१}{२}$

सातवें $\frac{५}{६}$ चे $\frac{५}{६}$ आणि २ हे प्रभागजातिअपूर्णांक आहेत. यांस बराबरकिमतीचें भागजातिअपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर $२\frac{१}{३}$

आठवें $५\frac{३}{८}$ चे $\frac{५}{८}$ चे $\frac{३}{१६}$ चे [illegible] चा [illegible] हे प्रभागजातिअपूर्णांक आहेत. यांस भागजातिअपूर्णांकांचें रूप दे.

उत्तर $\frac{३}{३२}$

नववें

नववें $\frac{१}{३}$ चे $\frac{८}{१२}$ चे $\frac{३}{८}$ चे $\frac{१२}{१४}$ चे $\frac{१४}{१८}$ हे प्रभागजातिअपूर्णांक आहेत· यांस भागजातिअपूर्णांकांचें रूप दे·

उत्तर $\frac{१}{१८}$

## साहावा प्रकार·
### समछेद करण्याचा·

समछेद ह्मणजे अपूर्णांकरकमांमध्यें वेगळाल्या किमतीचे व्यस्त छेद असले तर त्यांस बराबरकिमतीचे समछेद करावे·

### त्याची रीति·

व्यवहारी अपूर्णांकांचा अनेक व्यस्तछेद रकमा आहेत त्यांत हरएक अंश व त्याचे खालचे छेदांवांचून सर्व रकमाचे छेद हे परस्पर गुणावे· याप्रमाणें जितक्यारकमा आहेत· तितके वेगळाले गुणाकार करावे· ते अंशहोत· तसें सर्वरकमांतील छेद परस्पर गुणावे· तोगुणाकार त्या सर्व रकमांत छेदस्थळीं लिहिण्यास योग्य छेद जाले·

जेव्हां

जेव्हां भागानुबंधपूर्णांक किंवा पूर्णांक अथवा प्रभागजाति अपूर्णांक येतो तेव्हां त्या सर्वांस भागजातिअपूर्णांकांचें रूप देउन मग समछेद करावे.

## उदाहरणें.

प्रथम १/२ २/३ ३/४ यांस बराबर किमतीचें समछेद अपूर्णांकांचें रूप दे.

१×३×४=१२ हे १/२ याचे नवे अंश जाले.

२×२×४=१६ हे २/३ याचे नवे अंश जाले.

३×२×३=१८ हे ३/४ याचें नवे अंश जाले.

२×३×४=२४ हे सर्व अंशांखालीं लिहावयास योग्य छेद जाले.

१२/२४ १६/२४ १८/२४ हे वरचे व्यवहारी अपूर्णांकांचे बराबर किमतीचे समछेद अपूर्णांक जाले.

अथवा

अथवा·

याकामांतील गुणाकार मनांत करून लिहावें· याप्रमाणें·

$\frac{१}{२}$ $\frac{२}{३}$ $\frac{३}{४}$ = $\frac{१२}{२४}$ $\frac{१६}{२४}$ $\frac{१८}{२४}$ किंवा संक्षेप करून $\frac{६}{१२}$ $\frac{८}{१२}$ $\frac{९}{१२}$ असे लिहावे·

दुसरें $\frac{२}{७}$ $\frac{५}{९}$ यांस बराबर किमतीचें समछेद अपूर्णांकाचें रूप दे·

उत्तर $\frac{१८}{६३}$ $\frac{३५}{६३}$

तिसरें $\frac{२}{३}$ $\frac{३}{५}$ $\frac{३}{४}$ यांस बराबर किमतीचें समछेद अपूर्णांक रूप दे·

उत्तर $\frac{४०}{६०}$ $\frac{३६}{६०}$ $\frac{४५}{६०}$

चवथें $\frac{५}{६}$ २ $\frac{३}{५}$ ४ यांस बराबरकिमतीचें समछेद अपूर्णांक रूप दे·

उत्तर $\frac{२५}{३०}$ $\frac{७८}{३०}$ $\frac{१२०}{३०}$

जर दोन किंवा त्याहून अधिक व्यवहारी अपूर्णांकांच्या रकमा आहेत· आणि सर्व रकमांचा छेदांचा दृढभाजक मिळतो आहे· तर त्या सर्व रकमांचे छेद दृढभाजकानें वेगळाले भागोन

न भागाकार त्यात्या छेदांखालीं लिहावे. नंतर. हरएक रकमेचे अंशवछेद दुसर्या रकमां खालचे भागाकारानीं वेगळाले गुणावे. ते गुणाकार अंशवछेद होतात.

## उदाहरणें.

प्रथम $\frac{३}{२८}$ $\frac{४}{३८}$ हे व्यवहारी अपूर्णांक आहेत. यांस बराबर किमतीचें समछेद अपूर्णांक रूप दे.

$\frac{३}{२८}$ $\frac{४}{३८}$ = $\frac{२१}{१४०}$ $\frac{२०}{१४०}$ हे समछेद अपूर्णांक झाले.
५ ७

दुसरें $\frac{३}{२८}$ $\frac{४}{३८}$ $\frac{२}{४०}$ हे व्यवहारी अपूर्णांक आहेत. यांस बराबर किमतीचें समछेद अपूर्णांक रूप दे.

$\frac{३}{२८}$ $\frac{४}{३८}$ $\frac{२}{४०}$ = $\frac{१६८}{१४००}$ $\frac{१६०}{१४००}$ $\frac{५६}{१४००}$ हे समछेद अपूर्णांक झाले.
५ ७ ८

तिसरें $\frac{३}{७}$ $\frac{८}{१४}$ हे व्यवहारी अपूर्णांक आहेत. यांस बराबर किमतीचें समछेद अपूर्णांक रूप दे.

हे

$\frac{३}{१}$ $\frac{\frac{६}{१४}}{२}$ = $\frac{६}{१४}$ $\frac{६}{१४}$ हे समछेद अपूर्णांक झाले.

## सातवा प्रकार.

### हलकें पूर्णांक रूप.

हलकें पूर्णांक रूप ह्मणजे व्यवहारी अपूर्णांकास बराबर किमतीचें हलके पूर्णांकाचें रूप देणें.

#### त्याची रीति.

जावस्तूचे छेद आहेत. त्यावस्तूचा पूर्णांक अंशानीं गुणावा. तो त्यावस्तूचे जातीचा गुणाकार छेदानीं भागावा. भागाकार येईल तो त्याजातीचे पूर्णांक बराबर किमतीचे आले. बाकी राहीलती उतरती भांजणी प्रमाणें त्या त्या अंकानीं गुणोन त्याच छेदानीं भागावी. भागाकार येईल तो उतरते हलके किमतीचे पूर्णांक होतील.

#### उदाहरणें.

प्रथम २३ रुपयांचे $\frac{४}{६}$ हे पूर्णांकांत किती

किम

किमतीचे आहेत तें सांग.

रुपये अंशानीं गुण ४ × २३ = ९२ हे रुपये जाले. आतां ते छेदानीं भाग ५ ÷ ९२ = १८ बाकी २ रुपये राहिले. ते पावल्यानीं गुण ४ × २ = ८ पावले जाले. ते छेदानीं भाग ५ ÷ ८ = १ बाकी ३ पावले राहिले. ते रेसानीं गुण १०० × ३ = ३०० रेस जाले. ते छेदानीं भाग ५ ÷ ३०० = ६० रेस जाले.

```
    रु
    २३
     ४
५)९२
रु १८ -- रु २
          ४
     ५)८      पा
      पा १ -- ३
              १००
         ५)३००
           रें ६०
```

रु .. पा .. रें
१८ .. १ .. ६० हें उत्तर

दुसरें १६ रुपये २ पावले ५० रेस यांचे $\frac{2}{3}$ हे पूर्णांकांत किती किमतीचे आहेत हें सांग.

```
      रु    पा    रें
      १६ .. २ .. ५०
 ३) ३३ .. १ .. ०
      ११ .. १ .. ६६ ⅔  हें उत्तर
```

तिसरें १ रुपयांचे $\frac{3}{8}$ हे पूर्णांकांत किती

किम॰

किमतीचे आहेत तें सांग.

रु पा रें
उतर ० .. १ .. ५०

चवथें १ रुपयाचे $\frac{१}{९}$ हे पूर्णांकांत किती किमतीचे आहेत तें सांग.

रु पा रें
उत्तर ० .. ० .. ८८ $\frac{८}{९}$

पांचवें ५ रुपयांचे $\frac{३}{४}$ हे पूर्णांकांत किती किमतीचे आहेत तें सांग.

रु पा रें
उत्तर ३ .. ३ .. ०

साहावें २ रुपये १ पावले ५० रेंस यांचे $\frac{१}{२}$ हे पूर्णांकांत किती किमतीचे आहेत तें सांग.

रु पा रें
उत्तर १ .. ० .. [illegible]

सातवें १ मणाचे $\frac{४}{५}$ हे वजनी पूर्णांकांत किती किमतीचे आहेत तें सांग.

उत्तर [illegible] शेर

आठवें १ खंडीचे [illegible] हे केली पूर्णांकांत किती किमतीचे आहेत हें सांग.

म शे
उत्तर ६ .. ८

नववें

नववें १ बिघ्याचें $\frac{७}{८}$ हे पूर्णांकांत किती किमतीचे आहेत तें सांग.

पा का
उत्तर १७ .. १०

दाहावें १ दिवसांचे $\frac{३}{१०}$ हे विलायती माना चे पूर्णांकांत कितीकिमतीचे आहेत तें सांग.

वरें मि
उत्तर ७ .. १२

## आठवा प्रकार.

### उतरतें चढतें अपूर्णांक रूप.

व्यवहारी अपूर्णांकांस उतरतें अपूर्णांक रूप देणें आहे तर.

त्याची रीति.

त्यापूर्णांका खालीं जितके हलके पूर्णांक आहेत तितके वर अंशांचे पंक्तीस लिहून त्याचे वरचे भारी पूर्णांक त्याचेच खालीं लिहावे. नंतर अंशपंक्तीचे सर्व अंक परस्पर गुणावे तो गुणाकार अंश जाले. तसे- छेद पंक्तीचे सर्व अंक परस्पर गुणावे तो गुणाकार छेद

जाले

झाले.

चढतें अपूर्णांक रूप देणें आहे तर भारी अंक अंश पंक्तीस लिहून त्यांचे हलके अंक त्यांचे खालीं छेद पंक्तीस लिहावे. नंतर परस्पर गुणलेले अंशपंक्तीचे अंक अंश झाले. तसे छेद पंक्तीचे गुणले ते छेद झाले. ह्मणजे उतरतें चढतें बराबर किमतीचें अपूर्णांक रूप झालें.

## उदाहरणें.

प्रथम १ रुपयाचें $\frac{२}{९}$ यांस रेंसांचें अपूर्णांक रूप दे.

$$\overset{\text{रु}}{\frac{२}{९}} \times \frac{४}{१} \times \frac{१००}{१} = \overset{\text{रें}}{\frac{८००}{९}}$$ हें उत्तर.

दुसरें १ रेंसाचे $\frac{२}{७}$ यांस रुपयाचें अपूर्णांक रूप दे.

$$\overset{\text{रें}}{\frac{२}{७}} \times \frac{१}{१००} \times \frac{१}{४} = \overset{\text{रु}}{\frac{२}{२८००}}$$ हें उत्तर.

तिसरें एकरुपयाचे $\frac{१}{३}$ यांस रेंसांचें अपूर्णांक रूप दे.

उत्तर $\frac{४००}{३}$ रेंस.

चवथें

चवथें वजनी एकमणाचे $\frac{२}{५}$ यांस खंडी चें अपूर्णांक रूप दे.

उत्तर $\frac{१}{५०}$ खंडी

पांचवें वजनी एकखंडीचे $\frac{२}{३}$ यास शेराचें अपूर्णांक रूप दे.

उत्तर $\frac{१६००}{३}$ शेर

साहावें केली एकशेराचे $\frac{१}{२}$ यांस खंडी चे अपूर्णांकाचें रूप दे.

उत्तर $\frac{१}{१६००}$ खंडी

सातवें एकरेंसाचे $\frac{३}{४}$ यांस रुपयाचे अपूर्णांकाचें रूप दे.

उत्तर $\frac{३}{३२००}$ रुपया

आठवें एकरुपयाचे $\frac{१}{३}$ यांस रेंसांचे अपूर्णांकाचें रूप दे.

उत्तर $\frac{१०००}{३}$ रेंस

नववें ३ पावलें ५० रेंस यांस रुपयाचे अपूर्णांकाचें रूप दे.

उत्तर $\frac{४}{५}$ रुपया

दाहावें

दोहोंव ३ पावले ३३ रस यास रुपयाचें अपूर्णांकाचें रूप दे॰

उत्तर $\frac{३२३}{४००}$ रुपया

———

## व्यवहारी अपूर्णांकांची मेळवणी॰

जेव्हां सगळ्या रकमा समछेद आहेत॰ तेव्हां सर्वअंशांची बेरीज घेउन वर लिहावी॰ आणि त्याखाली समछेद लिहावे॰ ह्मणजे मेळवणी झाली॰

जेव्हां मेळवणी करावयाची आणि अपूर्णांक समछेद नाहींत॰ तेव्हां त्यांस समछेद करून रीती प्रमाणें मेळवणी करावी॰ आणि कदाचित् कांहीं रकमा प्रभागजाति अपूर्णांक असल्यास त्यांस भागजाति अपूर्णांकरूप द्यावें॰ तसें रकमा अनेक जातीचा असल्यास त्यांस समजाती कराव्या॰ नंतर सगळ्या रकमा समछेद करून त्यांचा अंशांची मेळवणी करावी॰ जर रकम भागानुबंध पूर्णांक आहे तर त्यास विष-

म



म अपूर्णांकाचें रूप देउन वर सांगीतल्या प्र माणें मेळवणी करावी· अथवा भागानुबंध पू र्णांकांत जे अपूर्णांक असतील त्यांस वर सां गीतल्या प्रमाणें समछेद करून मेळवणी करा वी· आणित्या बेरिजेचे· डावे बाजूस पूर्णांकांची मेळवणी करून लिहावी·

## उदाहरणें·

प्रथम $\frac{३}{५}$ आणि $\frac{४}{५}$ यांची बेरीज काय होत्ये·
$\frac{३}{५} + \frac{४}{५} = \frac{७}{५} = १\frac{२}{५}$ हें उत्तर·

नोट· समछेद केल्याचे पूर्वी अपूर्णांकांत जातिभेद आहे· जसें रुपया· पावला· रेंस· यांची परस्पर मेळवणी होतनाहीं· तशी त्यांची होतनाहीं· परंतु· जेव्हां अपूर्णांकास समछेद केले· ह्मणजे· वस्तूचे समजाति तुकडे आले· तेव्हां· त्यांची मेळवणी आणि वजाबाकी अंशांत परस्पर होत्ये·

दुसरें $\frac{३}{५}$ आणि $\frac{५}{६}$ यांची बेरीज काय होत्ये·

$\frac{३}{५} + \frac{५}{६} = \frac{१८}{३०} + \frac{२५}{३०} = \frac{४३}{३०} = १\frac{१३}{३०}$ हें उत्तर

तिसरें $\frac{५}{८}$ आणि $७\frac{१}{२}$ आणि $\frac{३}{४}$ च्या $\frac{१}{३}$ यांची

ची बेरीज काय होत्ये ती सांग.

$७ \frac{१}{२} = \frac{१५}{२}$ आणि $\frac{३}{४}$ च्या $\frac{१}{३} = \frac{१}{४}$

$\frac{५}{८} + \frac{१५}{२} + \frac{१}{४} = \frac{५}{८} + \frac{६०}{८} + \frac{२}{८} = \frac{६७}{८} = ८ \frac{३}{८}$

हें उत्तर.

चवथें $\frac{३}{७}$ आणि $\frac{६}{७}$ यांची बेरीज काय होत्ये.

उत्तर $१ \frac{२}{७}$

पांचवें $\frac{३}{४}$ आणि $\frac{५}{९}$ यांची बेरीज काय होत्ये.

उत्तर $१ \frac{११}{३६}$

साहावें $\frac{२}{७}$ आणि $\frac{५}{१४}$ यांचीबेरीज काय होत्ये.

उत्तर $\frac{९}{१४}$

सातवें $\frac{२}{३}$ आणि $\frac{३}{८}$ आणि $\frac{४}{७}$ यांची बेरीज काय होत्ये.

उत्तर $१ \frac{१०३}{१०८}$

आठवें [illegible] आणि $\frac{३}{८}$ आणि $२ \frac{१}{६}$ यांची बेरीज काय होत्ये.

उत्तर ३ [illegible]

नववें [illegible] आणि $\frac{१}{३}$ चे [illegible] आणि $९ \frac{३}{२०}$ यांची बेरीज काय होत्ये.

उत्तर

उत्तर १० $\frac{१}{६०}$

दाहावें एकरुपयाचे $\frac{२}{३}$ आणि एकपावल्याचे $\frac{५}{९}$ यांची बेरीज काय होत्ये.

पा. रें.
उत्तर ३ .. २२ $\frac{२}{९}$

अकरावें एकपावल्याचे $\frac{३}{५}$ आणि एकरेंसाचे $\frac{८}{१५}$ यांची बेरीज काय होत्ये.

रें.
उत्तर ६० $\frac{८}{१५}$

बारावें एकरुपयाचा $\frac{१}{३}$ आणि एकपावल्याचे $\frac{२}{९}$ आणि एकरेंसाचे $\frac{११}{१२}$ यांची बेरीज काय होत्ये.

रें.
उत्तर ७९ [illegible]

---

## व्यवहारी अपूर्णांकांची वजाबाकी.

जसे मेळवणी करावयाकरितां व्यवहारी अपूर्णांकास समजाति समच्छेद केले. तसे तयार करावे. नंतर भारी अंशांत थोडे अंश वजाकरून बाकी राहील त्याखाली समच्छेद लिहावे.

उदाहरणे

## उदाहरणें.

प्रथम $\frac{५}{६}$ आणि $\frac{१}{६}$ यांची वजाबाकी कर.

$\frac{५}{६} - \frac{१}{६} = \frac{४}{६} = \frac{२}{३}$ बाकी हें उत्तर.

दुसरें $\frac{३}{४}$ आणि $\frac{५}{९}$ यांची वजाबाकी कर.

$\frac{३}{४} - \frac{५}{९} = \frac{२७}{३६} - \frac{२०}{३६} = \frac{७}{३६}$ बाकी हें उत्तर.

तिसरें $\frac{७}{१२}$ आणि $\frac{५}{१२}$ यांची वजाबाकी कर.

उत्तर $\frac{१}{६}$ बाकी.

चवथें $\frac{५}{१२}$ आणि $\frac{६}{३६}$ यांची वजाबाकी कर.

उत्तर $\frac{९}{३६}$ बाकी.

पांचवें $\frac{५}{१२}$ आणि $\frac{१}{१३}$ यांची वजाबाकी कर.

उत्तर $\frac{५३}{१५६}$ बाकी.

साहावें ५, $\frac{३}{८}$ आणि ४ $\frac{१}{६}$ चे $\frac{२}{७}$ यांची वजा बाकीकर.

उत्तर ४ $\frac{३१}{१६८}$ बाकी.

सातवें एकरुपयाचें $\frac{५}{६}$ आणि एकपावल्याचे $\frac{३}{४}$ चे $\frac{२}{३}$ यांची वजाबाकी कर.

पा रें<br>उत्तर १ .. ७२ $\frac{२}{६}$

आठवें रुपये ५ $\frac{१}{६}$ चें $\frac{२}{७}$ आणि एक पाव

पावल्याचें $\frac{३}{८}$ यांची वजाबाकी कर.

रु पा रें

उत्तर १ .. १ .. ३० $\frac{२०}{४२}$

---

## व्यवहारी अपूर्णांकांचा गुणाकार.

भागानुबंध पूर्णांक आला तर त्यास विषम अपूर्णांकाचें रूप द्यावें. नंतर सर्व अंश परस्पर गुणावे ते अंश होतील. तसे सर्वछेद परस्पर गुणावे तेछेद होतील.

### उदाहरणें.

प्रथम $\frac{३}{४}$ यांस $\frac{२}{९}$ याणीं गुण.

$\frac{३}{४} \times \frac{२}{९} = \frac{१}{६}$ हें उत्तर.

दुसरें $\frac{२}{३}$ आणि ३ $\frac{१}{४}$ आणि ५ आणि $\frac{३}{८}$ चें $\frac{३}{४}$ हे सर्व परस्पर गुण.

$\frac{२}{३} \times \frac{१३}{४} \times \frac{५}{१} \times \frac{३}{८} \times \frac{३}{४} = \frac{३९}{८} = ४ \frac{७}{८}$

हें उत्तर ४ $\frac{२१}{२४}$

तिसरें $\frac{२}{७}$ यांस $\frac{५}{८}$ याणीं गुण.

उत्तर $\frac{५}{२८}$

चवथें

चवथें $\frac{४}{१८}$ यास $\frac{८}{२४}$ याणी गुण.

उत्तर $\frac{१}{१८}$

पांचवें $\frac{३}{७}$ आणि $\frac{४}{९}$ आणि $\frac{१४}{१८}$ हे सर्व परस्पर गुण.

उत्तर $\frac{८}{४८}$

साहावें $\frac{१}{२}$ आणि $\frac{२}{३}$ आणि ३ हे सर्व परस्पर गुण.

उत्तर १

सातवें $\frac{७}{९}$ आणि $\frac{३}{८}$ आणि ४ $\frac{८}{१४}$ हे सर्व परस्पर गुण.

उत्तर २ $\frac{१}{३०}$

आठवें $\frac{५}{६}$ आणि $\frac{६}{७}$ चे $\frac{२}{३}$ हे परस्पर गुण.

उत्तर $\frac{१०}{२१}$

नववें ६ आणि ५ चे $\frac{२}{३}$ हे परस्पर गुण.

उत्तर २०

दाहावें $\frac{३}{८}$ चे $\frac{२}{८}$ आणि ३ $\frac{२}{७}$ चे $\frac{१}{८}$ हे परस्पर गुण.

उत्तर $\frac{२३}{४२०}$

अकरावें ३ $\frac{३}{७}$ आणि ४ $\frac{१४}{३३}$ हे परस्पर गुण.

उत्तर



बारावें ५ आणि ७/३ आणि ३/८ चें ३/५ आणि ४ १/८ हे सर्व परस्पर गुण.

उत्तर २ ८/२१

---

## व्यवहारी अपूर्णांकांचा भागाकार.

जसे गुणाकार करावयास अपूर्णांक तयार केले तसेच भागाकार करावयास तयार करावे. नंतर अंश अंशानीं भागावे जर बराबर भागयेईल. तसे छेद छेदानीं भागावे जर बराबर भागयेईल आणि कांहीं ही बाकी नराहील. असें नहोईल तर भाजकाचे अंशवछेद बदलून लिहून गुणाकार रीती प्रमाणें भाजक व भाज्य हे परस्पर गुणावे ह्मणजे भागाकार जाला.

### उदाहरणें.

प्रथम २८/९ यांस ७/३ याणीं भाग.

२८/९ ÷ ७/३ = ४/३ = १ १/३ हें उत्तर.

दुसरें ५/८ यांस ७/१८ याणीं भाग.

हें

तिसरें $\frac{१६}{२५}$ यांस $\frac{४}{५}$ याणी भाग.

उत्तर $\frac{४}{५}$

चवथें $\frac{७}{१६}$ यांस $\frac{३}{४}$ याणी भाग.

उत्तर $\frac{७}{१२}$

पांचवें $\frac{१४}{९}$ यांस $\frac{७}{६}$ याणीं भाग.

उत्तर १ $\frac{१}{३}$

साहावें $\frac{६}{५}$ यांस $\frac{१८}{७}$ याणी भाग.

उत्तर $\frac{७}{१५}$

सातवें $\frac{१५}{३५}$ यांस $\frac{३}{५}$ याणीं भाग.

उत्तर $\frac{५}{७}$

आठवें $\frac{२}{७}$ यांस $\frac{३}{५}$ याणी भाग.

उत्तर $\frac{१०}{२१}$

नववें $\frac{९}{१६}$ यांस ३ याणीं भाग.

उत्तर $\frac{३}{१६}$

दाहावें $\frac{३}{५}$ यांस २ याणीं भाग.

उत्तर $\frac{३}{१०}$

अकरावें ७ $\frac{१}{३}$ यांस ९ $\frac{५}{८}$ याणीं भाग.

उत्तर



उत्तर $\frac{३३}{४३}$

बारावें $\frac{१}{३}$ चे $\frac{२}{३}$ यांस ७ $\frac{३}{५}$ चे $\frac{५}{७}$ याणीं भाग.

उत्तर $\frac{७}{१७१}$

## व्यवहारी अपूर्णांकांचें त्रैराशिक.

पूर्वरीती प्रमाणें अपूर्णांक तयार करावे. आणि त्यांत सम व व्यस्त कायअसेल तें पाहोन त्रिराशि रीती प्रमाणें इछाफळ उत्पन्न करावें.

## उदाहरणें.

प्रथम जर एकयार्ड बनाथीचे $\frac{३}{८}$ शांस एक रुपयाचे $\frac{२}{५}$ पडतात तर एकयार्ड बनाथीचे $\frac{५}{१६}$ यांस काय पडेल.

| | आ | | म | | अं |
|---|---|---|---|---|---|
| जर | या. | | रु. | | या. |
| | $\frac{३}{८}$ | : | $\frac{२}{५}$ | : : | $\frac{५}{१६}$ |

$\frac{२}{५} \times \frac{५}{१६} \times \frac{८}{३} = \frac{१}{३} =$ रु १ · · पा ३३ रें $\frac{१}{३}$ इछाफळ हें उत्तर.

दुसरें

दुसरें जर रुपें तोळे ३ $\frac{१}{२}$ यांस ४ रुपये २ पावले पडतात तर १ तोळ्यास काय पडेल.

रु पा रें

उत्तर १ .. १ .. ३३ $\frac{१}{३}$

तिसरें जर कोणी एक गलबताचे $\frac{३}{१६}$ यांची किंमत २७३१ रु. १ पावला होत्ये तर त्याच गलबताचे $\frac{५}{३२}$ यांची किमत किती होईल.

रु पा रें

उत्तर २२७६ .. ० .. १६ $\frac{२}{३}$

चवथें जर कलकत्यास १०० रुपयांची हुंडी घेणें तर मुंबईस १०८ $\frac{१}{२}$ रुपये पडतात तर कलकत्यास १२३०० रुपयांचे हुंडीस मुंबईस किती रुपये देणें पडतील.

रु पा रें

उत्तर १३३९० .. ३ .. ५०

पांचवें २७३७ रुपये २ पावले यांचें एक वर्षाचें व्याज दरशेंकडा ३ $\frac{१}{४}$ रुपये प्रमाणें किती होतील.

रु

रु पा रें

उत्तर ८८ .. ३ .. ८७ $\frac{१}{२}$

साहावें एक गलबताचा $\frac{१}{६}$ यास ७३० रु-
पये २पावले २५ रेंस पडतात तर २५०५ रुप-
यांस त्याचगलबताचा कोणता हिंसा येईल.

उत्तर $\frac{५०१०}{११६८८}$

सातवें एक फुट अथवा १२ अंगुळें लांब
आणि १२ अंगुळें रुंद असें फळें असावें त्या-
स ७ $\frac{३}{४}$ अंगुळें रुंदीचा तरवता लांब आहे ते-
व्हां त्यांतून किती लांब घेतल्यानें बराबर हो-
ईल.

उत्तर १८ $\frac{१८}{३१}$ अंगुळें

आठवें ९ $\frac{१}{२}$ यार्ड लांब आणि २ $\frac{१}{२}$ यार्ड
रुंद कापडाची रजई करावयाची आहे त्यास
एकेकडे रेशमीं असावें तेव्हां तें रेशमीं एक
यार्डाचे $\frac{३}{४}$ रुंदीचें लांब आहे तेव्हां किती लांब
घ्यावें ह्मणजे रजईस बराबर होईल.

उत्तर ३१ $\frac{२}{३}$ यार्ड

नववें

नवव कोणीएक आसद रोज १३ $\frac{५}{८}$ तास चालत असतां ३५ $\frac{१}{२}$ दिवसांत जामुकामीं गेला. त्याच मुकामीं जाणें आहे आणि रोज ११ $\frac{९}{१०}$ तास चालतो आहे तर किती दिवस लागतील.

उत्तर ४० $\frac{६१५}{९५२}$ दिवस

दाहावें एके पळटणांत ९७६ शिपाई आहेत त्यांस नवीं डगलीं द्यावयाचीं. एक डगल्यास बनाथ २ $\frac{१}{२}$ यार्ड लांब आणि १ $\frac{५}{८}$ यार्ड रुंद लागत्ये. सर्व डगल्यांस अस्तर असावें त्यास कापड $\frac{७}{८}$ यार्डाचे रुंदीचें लांब आहे तेव्हां किती यार्ड लांब घेतलें ह्मणजे सर्वडगल्यांस पुरेल.

उत्तर ४५३१ $\frac{३}{७}$ यार्ड.

---

## दशांश अपूर्णांकांचा प्रकार.

वर व्यवहारी अपूर्णांकांचा प्रकार सांगीतला. याशिवाय अपूर्णांक गणिताचा दुसराप्रकार आहेतो सांगतो. त्याचें नाव दशांश अपूर्णांक ह्मणतात.

दशांश

दशांश अपूर्णांक ह्मणायाचें कारण हें आहे कीं हे अंश दशकावर चालतात. जसे १० १०० १००० अंश.

जसें १ वस्तूचे १० किंवा १०० अथवा १००० किंवा अधिकही छेद करून त्यांतून २ किंवा किती भाग घ्यावयाचे आहेत तेव्हां १ रेघ फाड आणि त्या रेघेखालीं वस्तूचे तुकडे किती ते लिहि आणि त्यांतुन किती घ्यावयाचे ते त्याचरेघेचे वर लिहि.

जसें $\frac{२}{१०}$ $\frac{५}{१००}$ $\frac{७}{१०००}$ हे सर्व वेगळाले आहेत यांस पूर्ववत् अंश व छेद ह्मणावे. हें लवकर समजावें ह्मणोन व्यवहारी अपूर्णांकगणित रीती प्रमाणें लिहिलें आहे.

परंतु दशांश अपूर्णांक लिहावयाची चाल दाखवितो. जसें उजवेकडोन डावेकडे एकं दश शतं सहस्रं दशसहस्रं अशा अनुक्रमानें पूर्णांक मोजावे तसे अपूर्णांक डावेकडोन उजवेकडे दशस्थळापासोन दश शतं सहस्रं दशसहस्रं

हस्तं लक्षं अशाक्रमानें मोजून शेवटीं जें स्था
न येईल तितके छेद त्यांतून इतके अंश घे
तले असें आणावें.

उदाहरणें.

.५ येथें प्रथम बिंदु आहे त्यास दशांश चिन्ह
ह्मणावें पुढें ५ आहेत तें दशकस्थान होय
तेव्हां छेद १० ह्मणोन आणावें त्यांतून .५
अंश ह्मणजे ५ दशमांश जाहाले.

.६८ ह्मणजे ६८ शतांश आणावे.

.५६७ = ५ शें ६७ सहस्रांश जाहाले.

.७८९२ = ७ हजार ८ शें ९२ दशसहस्रां
श ह्मणावे.

.५७८३२ = ५७ हजार ८ शें ३२ लक्षां
श ह्मणावे.

.६७८४५६ = ६ लक्ष ७८ हजार ४ शें
५६ दशलक्षांश आणावे.

.४५७३२८९ = ४५ लक्ष ७३ हजार २ शें
८९ हे कोट्यंश ह्मणावे.

या

याप्रमाणें हे दशांश अपूर्णांक जाणावे.

---

## दशांश अपूर्णांकांची मेळवणी.

दशांश अपूर्णांकांची मेळवणी ह्मणजे अनेक रकमा आहेत त्यांत कांहिं पूर्णांक व कांहिं अपूर्णांक अथवा सर्व अपूर्णांकच आहेत त्यांस एकत्र मेळवून त्यांची एकंदर बेरीज जाणावयाचा प्रकार.

### त्याची रीति.

अनेक रकमा आहेत त्यांचे पूर्णांक पूर्णांक मेळवणी प्रमाणें लिहि. आणि अपूर्णांक दशांश आहेत ते डावेकडोन उजवेकडे दशांश निन्हाखालीं दशांशचिन्ह. पुढें दशस्थळींचाखालीं दशस्थळींचा शतस्थळींचाखालीं शतस्थळींचा अशा अनुक्रमानें सर्व रकमा मांडल्यावर खालीं रेघ फाडून पूर्णांक मेळवणी सारिखी दशांश चिन्हें नाहींतच असें मानून सर्व अंकांची बेरीज घे नंतर जा रकमेंत सर्व रकमा

पेक्षां

पेक्षां दशांश अधिक असतील· त्यांत उजवेक· डोन डावेकडे किती स्थळांवर दशांश चिन्ह आहे तें मोजून याबेरिजेंत तसें तितक्ये स्थळांवर दशां श चिन्ह करावें· ह्मणजे बेरीज जाहाली· याबेरि- जेंत दशांश चिन्हाचे डावेकडे आहेत ते पूर्णांक· तसें उजवेकडे आहेत ते अपूर्णांक दशांश·

## उदाहरणें·

| पहिलें· | दुसरें· |
| --- | --- |
| २·५७१२३ | २३५·३२५ |
| ·८३२ | ५३·५१३७८९ |
| २३·१ | २·४३२ |
| ·५७८९३४ | १·३४ |
| ५२·४६२३५३ | ८७·२ |
| ५·७५३२८९१ | २·३ |
| ८५·२९७८०६१ | ३८२·११०७८९ |

तिसरें· ३१५·२७८५२ २·५ १२·३४५ ·३४५६७८ १६·५२३ २·४३५६७९ यारकमा एकत्र मेळवून एकंदर बेरीज सांग·

उत्तर ३४९·४२७८७७

चवथें· २७८ ·८५३४५ १८·३४५ ५·३८७१५ ३·२५७८ १५ ·५३१२३

५३८९६३ २३५७९ ७८९६५४३२ या रकम एकत्र मेळवून एकंदर बेरीज सांग.

उत्तर ३३७०१८७०३२

पांचवें २८९ ३२ ५७३ ५२७३५ ४५७८९ २३५६ ३८२५६८७ ५२३२ ५७८९४२३ २५६३७९२३४ ३५२५४ २५७३ २५८ या रकमांची एकंदर बेरीज सांग.

उत्तर १६३०२२६९३३४

साहावें २३७४ ३४५५६८३५७ ७८९२३५६ २३५६८४३१२ ३२ ४५७८३२ ५४२७५५६३ ३२ १२ ३४५७८९३२ २३ २३४ २४५७२९८३२ या रकमांची एकंदर बेरीज सांग.

उत्तर ९६२३४९०५०८३२

सातवें ५८५९४५६६२ २४५ ३४२३ २५३४५६८९३४७८५७ ५७८५१७३ ६३९ २५३४५ ५६७८९४३५७५

६·३८९७३४५ ३२५·३२५७८९ १·२५८

१२·३४५६ यारकमांची एकंदर बेरीज सांग·

उत्तर ९२३·५९००४४१५३५७

---

## दशांश अपूर्णांकांची वजाबाकी·

वजाबाकी ह्मणजे दोनरकमा आहेत त्यांत जें अंतर आहे तें जाणण्याचा प्रकार·

### त्याचीरीति·

दोन रकमांमध्यें जारकमेंत पूर्णांक अधीक असतील तीरकम प्रथम वर लिहावी· जारकमेंत पूर्णांक उणे असतील ती रकम वर लिहिलेल्या रकमेचे खालीं लिहावी· त्याची रीति· पूर्णांक उजवेकडोन डावेकडे एकं दश शतं या अनुक्रमानें एकं खालीं एकं दशाकाखालीं दशक याप्रमाणें दोनीं रकमाचे लिहावे· अपूर्णांक दशांश चिन्हाखालीं दशांश चिन्हलिहून डावेकडून उजवेकडे दश शतं या अनुक्रमानें दशखालीं दश शतंखालीं शतं याप्रमाणें

दोनीं

दोनीं रकमांचे मांडून खालीं रेघ फाडावी. नंतर उजवेकडच्या शेवटील अंकापासून आरंभ करा. वा. खालचा अंक वरचे अंकांतून बादकरून बाकी राहील ती त्यारेघेखालीं त्याच अंकाखालीं मांडावी. याप्रमाणें पूर्णांकस्फुटा करावें.

कदाचित् वर अंकनाहीं अथवा खालचा अंकापेक्षां उणा आहे तर हातचा दशक घेउन तो बाद करावा. नंतर खालचे दुसर्‍ये अंकांत हातचा १ मेळवावा. याप्रमाणें खालचे रकमेचे शेवटील अंकापर्यंत करून बाकी राहील ती रेघेखालीं मांडावी. नंतर दशांश अधिक असतील त्यारकमेंत उजवेकडून डावेकडे किती स्थळांवर दशांश चिन्ह आहे तें मोजून रेघेखालीं बाकींत उजवेकडून डावेकडे तितक्ये स्थळांवर दशांश चिन्ह करावें. रेघेखालीं आहे ती बाकी जाणावी. तेंच दोन रकमांत अंतर ह्मणावें.

उदाहरणें

## उदाहरणें·

प्रथम· ३२·३५३४ यांतून २·७५८९७५ हे वजाकरून बाकी काय राहात्ये तें सांग·

३२३५३४ · · · · अधिक
२७५८९७५ · · उणे
२९५९४४२५ · · बाकी हें उत्तर·

दुसरें· १२३·४६७८९ यांतून २·५७८९५३ हे वजाकरून बाकी काय राहात्ये तें सांग·

१२३४६७८९ अधिक
२५७८९५३ उणे
१२०८८८९३७ बाकी हें उत्तर·

तिसरें· ३५·७८२ यांतून ·३५७९२ हे वजाकरून बाकी काय राहात्ये तें सांग·

बाकी ३५·४२४०८ हें उत्तर

चवथें· २५·७९८७६५ यांतून ·९८७६९८ हे वजाकरून बाकी काय राहात्ये तें सांग·

बाकी २४·८११०६७ हें उत्तर

पांचवें· २·३४५६८९८ यांतून ·९००३ हे वजाकरून बाकी काय राहात्ये तें सांग·

बाकी १·४४५३८९८ हें उत्तर

## दशांश अपूर्णांकांचा गुणाकार·

गुणाकार ह्मणजे जे गुणकांक असतील त्यांत उजवेकडोन एकाएका गुणकांकानें वरचे सर्व गुण्यांक गुणोन त्याचेखालीं पासून डावेकडे मांडीत जावें· याप्रमाणें जितके गुणकांक आहेत तितक्या गुणाकारांच्या ओळी होतील· नंतर मेळवणी करून बेरीज घ्यावी· आणि गुण्य व गुणक यामध्यें उजवे कडोन डावेकडे किती स्थळांवर दशांश चिन्हें आहेत तीं एकत्र मोजून याबेरीजेंत त्याप्रमाणें तितक्या स्थळांवर दशांश चिन्ह करावें ही बेरीज गुणाकार जाहाला·

### उदाहरणें·

प्रथम· ३२·३४५ हे गुण्यांक ५·४७ या गुणकांकानें गुणून गुणाकार काय जाहाला तो सांग·

गुण्य

| | |
|---|---|
| १२३४५ | गुण्य |
| ५४७ | गुणक |
| २२६४१५ | |
| १२९३८० | |
| १६१७२५ | |
| १७६९२७१५ | गुणाकार |

दुसरें ६२३४७९ हे गुण्यांक २५ या गुणकांकानें गुणून गुणाकार काय जाहाला तो सांग.

| | |
|---|---|
| ६२३४७९ | गुण्य |
| २५ | गुणक |
| ३११७३९५ | |
| १२४६९५८ | |
| १५५८६९७५ | गुणाकार |

तिसरें ५६७८३४२ हे गुण्यांक ३२ या गुणकांकानें गुण.

गुणाकार १८१७०६९४४

चवथें ७८९१२३४५ हे गुण्यांक ४५६ या गुणकांकानें गुण.

गुणाकार ३५९८४०२९३२०

पांचवें ८९१२३४५६७ हे गुण्यांक ५७८९ या गुणकांकानें गुण.

गुणाकार ५१५९३५६९०८३६३

साहावें

साहावें. ९१२३४५.६७८ हे गुण्यांक ६८७९ यागुणकांकानें गुण.

गुणाकार ६२७६०२५.११८९६२

सातवें. ३५७१२३४ हे गुण्यांक २३७८९ यागुणकांकानें गुण.

गुणाकार ०८५१४६३९७६२६

---

## संक्षेप.

### प्रथम संक्षेप.

सर्व अंक १ एकानीं गुणावे आणि गुणकांकांत त्याएकावर जितकीं शून्यें असतील तीं मोजून गुण्यांकांत दशांश चिन्ह असल्यास तेथून तें दशांशचिन्ह त्याशून्य संख्यास्थळांवर उजवेकडे सारावें. तेथपर्यंत अंक नसतील तर शून्यदेउन तेवढीं स्थळें करावीं ह्मणजे गुणाकार जाला.

### उदाहरणें.

प्रथम. ५१.२ हे गुण्यांक १००० यागुणकां

कां

कांकानें गुण.

गुणाकार ५११३००.०

दुसरें. २.७१४ हे गुण्यांक १०० यागुणकां-
कानें गुण.

गुणाकार २७१.४

तिसरें. .९१६ हे गुण्यांक १००० यागुणकां-
कानें गुण.

गुणाकार ९१६.०००

चवथें. २१.३१ हे गुण्यांक १००० यागुणकां-
कानें गुण.

गुणाकार २१३१०.००

---

## दुसरा संक्षेप.

गुण्यांक व गुणकांक यांत दशांश स्थळें बहुत असल्यास गुणाकारांत फार येतील या-जकरितां संक्षेपरीति सांगतो अशीकीं दशांश-स्थळें हावीं तेवढींच गुणाकारांत होतील.

दशांशस्थळें गुणाकारांत किती करावया-
चीं

चीं ती संख्या मनांत आणून गुण्यांकांत तित-
कीं दशांशस्थळें मोजून त्यासंख्येचे शेवटील
स्थळाखालीं अंक लिहि· जोअंक गुणकांकांत
एकंचेस्थळीं आहे तो· आणि तेथून बाकी पूर्णां-
क उजवेकडे उलटे लिहि· आणि अपूर्णांक त्या
एकंपासून डावेकडे उलटे लिहि· नंतर गुणाया-
स आरंभ कर· जागुणकानें गुणायाचें त्याचे
वरचे अंकापासून होईल असा· परंतु उजवे
कडील शेवटापासून लिहावे· मागील सोडि-
ल्ये अंकांतून एक जवळचा अंक गुणोन त्यां-
तून हातचे घेण्याचा मार्ग· ५ पासून १४ पर्यंत
असल्यास हातचा १ धरावा· तसें १५ पासून
२४ पर्यंत हातचे २ तसें २५ पासून ३४ पर्यंत
असल्यास हातचे ३ याप्रमाणें पुढें ही· तोहा-
तचा अंक त्यांत मेळवून लिहावे· नंतर पूर्वप्र-
माणें मेळवणी करून तितक्ये इछिल्ये स्थळां-
वर दशांशचिन्ह करावें· ह्मणजे गुणाकार जा-
ला·

उदाहरणें

## उदाहरणें·

प्रथम· २७·१४९८६ हेगुण्यांक ९२·४१०३५ यागुणकांकानीं गुण असेकिं गुणाकारांत दशांशस्थळें चार होतील·

संक्षेप रीति·

| |
|---:|
| २७·१४९८६ |
| ५३·०१४२९ |
| २४४३४८७४ |
| ५४२९९७ |
| १०८५९९ |
| २७१५ |
| ८१ |
| १४ |
| २५०८९२८० |

चालती रीति

| | |
|---:|:---|
| २७·१४९८६ | |
| ९ | २·४१०३५ |
| १३ | ५७४९३० |
| ८१ | ४४९५८ |
| २७१४ | ९८६० |
| १०८५९९ | ४४ |
| ५४२९९७ | २ |
| २४४३४८७४ | |
| २५०८९२८० | ६५०५१० |

दुसरें· ४८०·१४९३६ हेगुण्यांक २·७२४१६ यागुणकांकानीं गुण· असेकिं गुणाकारांत दशांशस्थळें चार होतील·

गुणाकार १३०८·००३६

तिसरें· २४९०·३०४८ हेगुण्यांक ·५७३२८६ यागुणकांकानीं गुण· असेकिं गुणाकारांत दशांशस्थळें पांच होतील·

गुणाकार १४२७·६५६८७

चवथें

चवथें ३२५·७०१४२८ हेगुण्यांक ·७२१८३०३ यागुणकांकानीं गुण असेकिं गुणाकारांत दशांशस्थळें तीनहोतील·

गुणाकार २३५·१०४

---

## दशांश अपूर्णांकांचा भागाकार·

याचीरीति पूर्णांक भागाकारा सारिखी आहे परंतु भाज्यांकांची कांहिं बाकी राहिली असतां भाज्यांकावर पूज्यदेउन तें खालीं बाकीवर आणून भाग घ्यावा याप्रमाणें बाकी० पर्यंत करावें· भागाकारांत दशांशचिन्ह देणें तर भाजकांकांत दशांशस्थळें किती असतील तितकीं भाज्यांकांत वजादेउन बाकी जितकीं राहातील तितकीं भागाकारांत उजवेकडून डावेकडे मोजून दशांश चिन्ह करावें· कदाचित् भाजकांकापेक्षां भाज्यांकांत दशांशस्थळें उणी असतील तर पूर्वींच त्याजवर पूज्यें देउन दशांशस्थळें बरोबर करावीं नंतर भागाकारास आरंभकरावा· याचप्रमा

णें

णें पूर्णांक भागाकारांत भाज्याची बाकी राहि-
ली आणि वर अंकनाहिं तर वरचे भाज्यांकाव-
र दशांशचिन्ह करोन त्याजवर पूज्य देउन तें त्या-
खालचे बाकीवर देउन भागघेउन भागाकारीं
लिहावा· याप्रमाणें बाकी० पर्यंत करावें· नंतर
दशांश चिन्हापुढें किती पूज्यें आहेत तितकीं
भागाकारांत उजवेकडोन डावेकडे स्थळें मोजून
दशांश चिन्ह करावें·

## उदाहरणें·

प्रथम· २३·५६७८ हे भाज्यांक २·३४ हे भाज-
कांक याणी ते भाज्यांक भागून भागाकार काय
आला तो सांग·

२·३४) २३·५६७८००००० (१०·०७१७०९४
२३४
· · १६७८
१६३८
· · ४००
२३४
१६६०
१६३८
· · २२००
२१०६
· · ९४०
९३६
· · ४
· १५

दुसरें ·४८५२०९९८ हे भाज्यांक १७८ या भाजकांकानीं भागून भागाकार काय आला तो सांग·

भागाकार ·००२७२५८९

तिसरें २७·००००० हे भाज्यांक ·२६३९ या भाजकांकानीं भागून भागाकार काय आला तो सांग·

भागाकार १०२·३११४

च्वथें १२३·७०५३६ हे भाज्यांक ५४·२५ या भाजकांकानीं भागून भागाकार काय आला तो सांग·

भागाकार २·२८०२

पांचवें १२ हे भाज्यांक ·७८५४ या भाजकांकानीं भागून भागाकार काय आला तो सांग·

भागाकार १५·२७८

साहावें ४१९५·६८ हे भाज्यांक १०० या भाजकांकानीं भागून भागाकार काय आला तो सांग·

भागाकार

भागाकार ४१·९५६८

सातवें ·८२९७५९२ हे भाज्यांक ·१५३ याभाजकांकानीं भागून भागाकार काय आला तो सांग·

भागाकार ५·४२३२

---

## प्रथम संक्षेप·

जेव्हां भाजक पूर्णांकि असोन त्याजवर शून्यें आहेत तेव्हां भाज्यस्थळीं दशांशचिन्ह असल्यास तीं शून्यें मोजून पुंसून टाक· आणि तितकीं शून्यसंख्या अंकस्थळें सोडून दशांश चिन्ह डावेकडेसार· तितके अंक नसल्यास शून्यें देउन स्थळें पुरींकर· पूर्वप्रमाणें भाग·

## उदाहरणें·

प्रथम ४५·५ हे भाज्यांक २१०० याभाजकांकानीं भागून भागाकार काय आला तो सांग·

भागाकार

२१)·४५५०(·०२१६ भागाकार·

```
 ४२
 ·३५
 २१
 १४०
 १२६
 ·१४
```

दुसरें· ४१०२० हे भाज्यांक ३२००० या भाजकांकानीं भागून भागाकार काय आला तो सांग·

भागाकार १·२८१८७५.

तिसरें· ९५३ हे भाज्यांक २१६०० या भाजकांकानीं भागून भागाकार काय आला तो सांग·

भागाकार ·०४४१२.

चवथें· ६१ हे भाज्यांक ७९००० या भाजकांकानीं भागून भागाकार काय आला तो सांग·

भागाकार ·०००७७२

---

दुसरा

## दुसरा संक्षेप.

पूर्व संक्षेप रीती वरून दिसतें किं. भाजक १ या अंकावर शून्यें असतील. जसें १० अथवा १०० अथवा १००० अथवा आणिखी हितीं शून्यें मोजून पुसून टाकून भाज्यांकांत तितके स्थळांवर डावेकडे दशांश चिन्ह दिलें ह्मणजे तोच भागाकार जाला. ह्मणावा.

### उदाहरणें.

प्रथम. २१७·३ ÷ १०० = २·१७३

दुसरें. ५·१६ ÷ १०० = ·०५१६

तिसरें. ४१९ ÷ १० = ४१·९

चवथें. ·२१ ÷ १००० = ·०००२१

---

## तिसरा संक्षेप.

जेव्हां भाजकांत अंक संख्या बहूत आहे अथवा भागाकारांत दशांश स्थळें इछेप्रमाणेंच यावीं असें आहे. तेव्हां भागाकारांत पूर्णांकस्थळें किती येतील तो शुमार करून

तीं

तींव इछिलेलीं दशांशस्थळें मिळून कितीस्थ-
ळें होतात तितकीं भाजकस्थळें ठेवुन बाकी
कापून टाक. नंतर त्याभाजकास किती भाज्य
योग्य असेल तेवढा ठेवुन बाकी भाज्य कापून
टाक. आतां त्या भाजकानी तो भाज्य भागून
बाकी राहील तो नवा भाज्यजाला. त्यास पूर्व
भाजकांत उजवे शेवटचा एक अंक कापून बाकी
राहील तो नवा भाजक याप्रमाणें शेवटपर्यंत
करावें. सोडिल्ये अंकाचा भाग मनांत कल्पून
पूर्व गुणाकारांत सांगीतल्याप्रमाणें हातचा अं
क घेवुन मिळवावा. ह्मणजे दशांश स्थळें पूर्वीं
सांगीतल्या प्रमाणें इछिलीं येतील.

## याजवरील टीप.

जेव्हां भाजकस्थळीं अंकस्थानें उणीं आ
हेत आणि इछिलीं दशांशस्थळेंसुद्धां भागाका
र अंकस्थळें अधिक आहेत. तेव्हां भाजकस्थ
ळींचे अंक निःशेष जाल्यावर बाकी भाज्य अ-
सतील ते घेवुन पुनः भागावे. तितकीं स्थळें

होत

होनपर्यंत·

## उदाहरणें·

प्रथम· २५०८९·२८०६ हे भाज्यांक ९·२४१०३५ याभाजकांकानीं भाग असेकिं भागाकारांत दशांशस्थळें चार होतील· यावरून याउदाहरणीं भागाकारांत अंकस्थळें साहा होतील·

## संक्षेपरीति·

```
९·२४१०३५)२५०८९·२८०६(२७·१४९८
          ६६०७२१
           १३८४९
            ४६०८
             ९१२
              ८०
               ६
              ==
```

## चालती रीति·

```
९·२४१०३५)२५०८९·२८०६(२७·१४९८
          ६६०७२१०६
           १३८४८६१  ०
            ४६०७५७  ५०
             ९१११६  १००
              ७९४६७८५०
               ५५३ ६५७०
```

दुसरें

दुसरें· ४१०९·२३५१ हे भाज्यांक २३०·४०९ या भाजकांकानीं भाग असेकिं भागाकारांत दशांशस्थळें चार होतील·

उत्तर १७·८३४५

तिसरें· ३७·१३४३८ हे भाज्यांक ५७१३·९६ या भाजकांकानीं भाग असेकिं भागाकारांत दशांशस्थळें पांच होतील·

उत्तर ·००६४९

चवथें· ९१३·०८ हे भाज्यांक २१३९·२ याभाजकांकानीं भाग असेकिं भागाकारांत दशांशस्थळें तीन होतील·

उत्तर ·४२६

## दशांश भांजणी·

व्यवहारी अपूर्णांकांस दशांश रूप द्यावयाचीरीति· तेंरूप बरावर किमतीचें होईल· दशांश भागाकार रीती प्रमाणें अंशछेदानीं भागावे· अंशावर हावीं तेवढीं शून्यें द्यावीं· भागाकार येईल ते दशांश जाले·

उदाहरणें

## उदाहरणें·

प्रथम· $\frac{७}{२४}$ यांस दशांश रूप दे·

```
२४)७·००००  (·२९१६ हें उत्तर
   ४८
   ----
   २२०
   २१६
   ----
   ··४०
     २४
     ----
     १६०
     १४४
     ----
     ·१६
```

२४ = ४ × ६ तेव्हां

```
४)७·००
६)१·७५००
  ·२९१६
```

दुसरें· $\frac{१}{४}$ आणि $\frac{१}{२}$ आणि $\frac{३}{४}$ यांस वेगळालें दशांश रूप दे·

उत्तर ·२५ आणि ·५ आणि ·७५

तिसरें· $\frac{५}{८}$ यांस दशांश रूप दे·

उत्तर ·६२५

चवथें $\frac{३}{२५}$ यांस दशांश रूप दे·

उत्तर ·१२

पांचवें· $\frac{६}{१९२}$ यांस दशांश रूप दे·

उत्तर ·०३१२५०

साहावें

साहावें· $\frac{५५०}{३८४२}$ यांस दशांश रूप दे·

उत्तर·१४३१५४

---

## दशांश रूप रीति·

हलक्ये अंकास भारी अंकाचे दशांशांचें रूप देण्याचा प्रकार लिहितो· हलक्ये किमतीचे पूर्णांकास बदल भारी किमतीचे पूर्णांकाचे दशांशांचें रूप द्यावें·

## त्याचीरीति·

प्रथम· शेवटील हलक्ये अंकापासून आरंभ करावा शेवटील अंकाची वस्तु· त्याचे वरचे भारी १ पूर्णांकांत किती आहेत तितक्ये अंकानीं तो शेवटील अंक· दशांश भागाकार रीती प्रमाणें भागावा· नंतर भागाकाराची वरचे रकमेशीं मेळवणी दशांश मेळवणी प्रमाणें करावी· नंतर त्याचे वरचे १ पूर्णांकांत हे अंक किती आहेत तितक्यानी ती बेरीज भागावी· भागाकार येईल तो पुनः वरचे रकमेशीं पूर्वव

नू

त् मिळवून शेरीज घ्यावी. याप्रमाणें वरचा शे-
वटील भारीअंक आहे त्यापर्यंत करावें.

## उदाहरणें.

प्रथम ३ रुपये ३ पावले ४० रेंस यांत पा-
वले व रेंस यांस रुपयांचे दशांशांचें रूप दे.

```
रु   पा   रें
३ .. ३ .. ४०
      रें
१००)४०·०(·४
    ४००
    ...
    पा ·४
     ३
४)३·४०
  ·८५
रु ३
  ३·८५
```

```
         ·८५
          ४
पा      ३·४०
         १००
रें      ४०·००
```

रु ३·८५ — रु ३ .. पा ३ .. रें ४० बराबर आहेत

दुसरें वजनी तोलाचें ८ खंडी १२ मण
१६ शेर २६ तोळे ६ मासे ४ गुंजा यांत हलक्ये
किमतीचे पूर्णांकांस बद्दल खंडीचे दशांशांचें
रूप दिलें असतां किती होतात. तें सांग.

उत्तर खं ८·६२११८४८९५८०३५७१२५

तिसरें

तिसरें केली मापाचें. ४ खंडी ५ मण ५ पायली १ अधोली १ शेर २ पाव यांत हलक्ये किमतीचे पूर्णांकास बदल खंडीचे दशांशाचें रूप दे. आणि किती होतात तें सांग.

उत्तर खं ४·२७४४७९१५६२५

चवथें चौरस जमीन मोजणीचें. १२ बिघे १६ पांड १५ काठ्या ३ हात १ वीत २ मुष्टि २ अंगुळें ४ यव यांत हलक्ये अंकास भारी अंकाचे दशांशांचें रूप देउन किती होतात तेसांग.

उत्तर बि १२·८३९१८८

पांचवें भूमीचें लांब मोजाचें. ५ योजनें १ गव्यूति १ कोस १००० दंड २ हात ४ अंगुळें ४ यव यांत हलक्ये अंकास भारी अंकाचे दशांशांचें रूप देउन किती होतात ते सांग.

उत्तर यो ५·८७५०६८३५९३७५

साहावें वस्त्र काष्ठ मोजणीचें. ५० गज १ हात ६ नस्क १ अंगुळ यांत हलक्यें पूर्णांकास बदल भारी अंकाचे दशांशांचें रूप दे आणि

किती

किती होतात ते सांग.

उत्तर ग ५०.७७०८३

सातवें काळमानाचें. ५ वर्षे १ अयन २ ऋ-
तु १ मास १ पक्ष ३ दिवस ४ प्रहर ० मुहूर्त १ घ-
टका ३० पळें यांत हलक्ये अंकास भारी अंकाचे
दशांशांचें रूप देउन किती आले तें सांग.

उत्तर व ५.९६८१२५.

आठवें विलायती काळमानाचें. २ वर्षे ६ म-
हिनें २ वुईक ४ दिवस १२ अवर ३० मिन्युटें ३०
सेकंद यांत हलक्ये अंकांस भारी अंकाचे दशां
शांचें रूप देउन किती आले ते सांग.

उत्तर व २.५१२४२०८२१८६८१३

नववें वजनीतोल २५ खंडी १८ मण ३६ शे
र २० तोळे ४ मासे ६ गुंजा यांत हलक्ये किमती
चे पूर्णांकास वदल खंडीचे दशांशांचें रूप दे.

खं

उत्तर २५.९४५९१०६१७४

दाहावें कैलीमाप. १२ खंडी १५ मण ६

पायली

पायली ० अधोली १ शेर ३ पाव यांत हलक्ये किमतीचे पूर्णांकांस बदल खंडीचे दशांशांचें रूप दे.

उत्तर १२·११६८२२०१६

अकरावें चौरसजमीन. ५० बिघे १५ पांड १२ काठ्या ० हात ० बीनि १ मुष्टि १ अंगुळ ६ यवः यांत हलक्ये किमतीचे पूर्णांकांस बदल बिघ्याचे दशांशांचें रूप दे.

उत्तर ५०·७८०१०२६७८५

बारावें लांबभूमि. ५० योजनें ० गव्यूति १ कोस १५०० दंड ३ हात ६ अंगुळें २ यव यांत हलक्ये किमतीचे पूर्णांकांस बदल योजनाचे दशांशांचें रूप दे.

उत्तर ५०·४३७६०१८८८

तेरावें वस्त्र किंवा काष्ठ १०० गज १ हात १० तसू १ अंगुळ यांत हलक्ये किमतीचे पूर्णांकांस बदल गजाचे दशांशाचे रूप दे.

उत्तर १००·९३७५

दशांश

## दशांश त्रिराशि.

यानी गति पूर्णांक गणितामध्यें सांगीतली आहे

## उदाहरणें.

प्रथम १ तोळा ३ मासे यांस १ रुपया ३ पावले ५ रेंस पडतात तर ३ गुंजांस काय पडेल.

| आदि | मध्य | अंत | इच्छाफळ |
|---|---|---|---|
| तो. मा. | रु. पा. रें. | गुं. | |
| १ .. ३ | १ .. ३ .. ५ | ३ | |

मा
१२)३·००
·२५

तो १
तो १·२५

रें
१००)५·००(·०५
पा ३
४)३·०५००
·७६२५
रु १
१·७६२५

गुं
८)३·०००
·३७५ मा
१२)·३७५००
तो ·०३१२५

१·७६२५

```
                 १·७६२५
                ·०३१२५
               ८८१२५
             ३५२५०
           १७६२५
         ·५२८७५
तो १·२५)·०५५०७८१२५(·०४४०६२५
         ५००
         ·५०७                ·१७६२५०० पा
          ५००                        १००
          ··७८१              १·७६२५००००
            ७५०
            ·३१२
             २५०
             ·६२५
              ६२५
              ···
```

रें
·०४४०६२५ = १७·६२५ सहस्रांश हे बराबर आहेत. हें उत्तर.

दुसरें जर १ मणतुपास ८ रुपये २ पावले २० रेंस पडतात तर ७ तोळ्यांस कायपडेल.

आ· म· अं इछाफळ
म · रु पा रें · · तो ·
१ · ८ · · २ · · २० · · ७ · ·०५३४३७५=

रें
२१·३७५ हें उत्तर

तिसरें जर १ खंडीभातास १५ रुपये

१ पावला १५ रेंस पडतात तर १ मण ३ पावली १ अधोली १ शेर यांस कायपडेल.

आ म अं
खं . रु पा रें .. म पा अ शे
१ . १५ .. १ .. १५ .. १ .. ३ .. १ .. १

रु पा रें
रु. १.००३२४२१८७५ = १ .. ० .. १२९६८७५.

इछाफळहें उत्तर

चवथें जर १ बिघा जमिनीस सर्कार देणें १२ रुपये ३ पावले २२ रेंस पडतात. तर १ पांड ५ काठ्या यांस काय पडेल.

आ म अं
वि . रु. पा. रें .. पां. का.
१ . १२ .. ३ .. २२ .. १ .. ५

रु पा रें
रु ०.८००३१२५ = ० .. ३ .. २०.१२५ इछाफळ

पांचवें जर कांहीं ओझें ८ योजनावर पोंचविलें त्यास मजूरी ५ रुपये १ पावला २० रेंस दिल्हे. आतां तेंच ओझें १ कोस ५०० दंड ब्रुनक्यांवर पोंचलें पाहिजे त्यास मजूरी

मजूरी कायपडेल.

आ. म. अं.

यो. . रु. पा. रें. . . को. टं.

८ . ५ . . १ . . २० . . १ . . ५००

रु पा रें

रु ०.२०७०२१२५ = ० . . ० . . ८२.८१२५ इछा-

फळ हें उत्तर

साहावें जर कोणे मनुष्यास सर्कारांतून वेतन ३० दिवसांचें १२०० रुपये २ पावलें ५० रेंस येतात. तर ३ दिवस २ प्रहर इतक्यांचें किती येईल.

आ म अं

दि . रु पा रें . . दि प्र .

३० . १२०० . . २ . . ५० . . ३ . . २ .

रु. पा. रें.

रु १२०.०६७७०८३ = १२० . . ० . . २७.०८३३२

इछाफळ हें उत्तर

---

# दशांश अपूर्णांक पंचराशि·

याची रीति पूर्णांक गणितामध्यें सांगीतली आहे·

## उदाहरणें·

प्रथम जर ४ मनुष्यांची तैनात ७ दिवसांत १३ रुपये २ पावले होतात· तर १४ मनुष्यांची तैनात १० दिवसांत किती रुपये होतील तेसांग·

| | आ· | | म· | | अं· |
|---|---|---|---|---|---|
| | म· | रु· | पा· | | म· |
| | ४ | १३ | २ | | १४ |
| दि | ७ | | | | १० दि· |
| | ४ | १३ | | | १४ |
| | ७ | ४ | | | १० |
| | २८ | ५४ | | | १४० |

याउदाहरणांत ४ मनुष्यांहून १४ मनुष्य अधीक आहेत आणि १३ रुपये २ पावले यांहून इछाफळ अधिक येण्यास योग्य आहे· तसें ७ दिवसांहून १० दिवस अधिक आहेत· आणि इछाफळ मध्यांकाहून

अधिक

अधिक येण्यास योग्य आहे· तेव्हां हें उदाहरण समराशि आहे· याकरितां अंत्यांक मध्यांकानीं गुण आणि आदिअंकानीं भाग· जो भागाकार येईल तें इछाफळ·

```
         १४०
          ५४
         ५६०
        ७००
   २८)७५६०(२७०
        ५६
        १९६
        १९६
        ...०
         पा·
    ४)२७०   पा
     रु ६७ — २
```

६७ रुपये २ पावले इछाफळ हें उत्तर

दुसरें· जर ८ मनुष्यांचे कुटुंबास ९ महिन्यांत २००० रुपये खर्च लागतो· तर १८ मनुष्यांचे कुटुंबास १२ महिन्यांत किती रुपये खर्च लागेल तें सांग·

| आ· | म· | अं· |
|---|---|---|
| मा | रु | मा |
| ८ | २००० | १८ |
| म ९ | | १२ म· |
| | | उत्तर |

६००० रुपये इछाफळ हें उत्तर

तिसरें जर मुद्दल १०० रुपयांचें १ वर्षांत व्याज ५ रुपये होतात. तर मुद्दल ७५० रुपयांचें व्याज ७ वर्षांत किती रुपये होतील.

आ. म. अं. इ.
मु. रु. व्या. रु. मु. रु. रु. पा.
१०० - ५ . . ७५० : २६२ .. २ हें उत्तर
व १ - . . ७ व :

चवथें जर कोणी आसूद १३० कोस जमीन १२ बरांनी ३ दिवसांत चालतो. तर ३६० कोस जमीन चालावयास १० बरांचे किती दिवस लागतील तें सांग.

आ. म. अं.
की. दि. को.
१३० . ३ . . ३६०
बरें १२ . . . १० बरें

दि प्र मु घ प
९ .. ७ .. २ .. १ .. ३९ $\frac{3}{13}$ इछाफळ हें उत्तर

## द्वादशांश अपूर्णांक.

द्वादशांश अथवा वांकडा गुणाकार. याचेरीतीनें शिल्पिलोक कामाची मोजणी करितात.

त्यामोजणींत मापाचे अवयव हे आहेत. जे. फुट. इंच. आणि. पाव. याहून लाहान अवयव अतिसूक्ष्म ह्मणोन बहुधा घेतनाहींत.

## त्यामोजणीचीरीति.

मापांत जे दोन अंक गुणायाचे ते एकाखालीं एक लिहावे. असेकिं. फुटीखालीं फूट इंचाखालीं इंच पावाखालीं पाव असे येतील.

नंतर गुण्यांकाचीं सर्वपदें उजवेशेवटाकडून गुणकांकाचे पहिल्ये पदानीं गुणावीं. जें गुणलें पद तें त्याचेखालीं लिहावें. पदांतील गुणला अंक बारांवर गेल्यास बारानीं भागून बाकी राहील ती तेथें लिहावी. भागाकार येईलतो हातचा अंक डावे कडील पदगुणोन

त्यांत

## त्याचीरीति·

सरकती आहेत त्यामध्यें हरएकएक मनुष्या-
च्या वेगळाल्ये भितीचा पैका किंवा कांहिं ही असेल
तें वेगळालें त्याचे त्याचे आलेले मुदतीनें गुण· आ-
णि त्या सगळ्या रकमांची बेरीज घे· नंतर या सगळ्या
गुणाकारांचे बेरिजेस जसा सगळा नफा तोटा किंवा
कांहिंही होतो· तसा एक मनुष्याचे आल्ये मुदतीनें
गुणल्येल्ये राशीस सगळ्याचा वांटा होतो·

## उदाहरणें·

प्रथम दोघानीं सरकती व्यापार केला त्यांत भां-
डवल· क·चे ५०० रुपये त्यास ४ महिनें जाले· आणि·
ग·चे· ६०० रुपये त्यास ५ महिनें जाले त्यासरकत
व्यापारांत नफा २४० रुपये जाला तो दोघांस भागा-
प्रमाणें कसा वांटून द्यावा तें सांग·

| क· | | ग· | |
|---|---|---|---|
| ५०० | | ६०० | |
| ४ | | ५ | |
| २००० | + | ३००० | = ५,००० हीक· आणि ग· यां- |

ची वेगळाली मूळराशि त्या
त्या मुदतीनें गुणून बेरीज·

आ·

| | आ· | | म· | | अं· | | नु· | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जसे | ५००० | : | २४० | : : | २००० | : | ९६ | रु· क· चा नफा· |

$$\frac{2000}{5000)\overline{480000}} \; ९६$$

| जसे | ५००० | : | २४० | : : | ३००० | : | १४४ | रु· ग· चा नफा· |
|---|---|---|---|---|---|---|---|---|

३०००
५०) ७२०००० — १४४

१४४/२४० ताळा हें उत्तर

दुसरें च· ज· या दोघानीं एक कुरण घोडीं चा-रावयाकरितां मखता ठरावून घेतलें मखता ५४० रुपये त्या कुरणांत च· चीं २३ घोडीं २७ दिवस चरलीं· आणि ज· चीं २१ घोडीं ३९ दिवस चरलीं मखत्याचे रुपये दोघानीं किती द्यावे तें सांग·

| | | रु | | पा | | रें |
|---|---|---|---|---|---|---|
| उत्तर | च· | २३२ | · · | १ | · · | ५० |
| | ज· | ३०७ | · · | ० | · · | ५० |

तिसरें प· फ· ब· या तिघानीं गाई चारावयाशि कुरण घेतलें त्याचें देणें एक वर्षाचें ३०० रुपये त्यांत प· चा ७ गाई ३ महिनें फ· चा ९ गाई ५ महिने· ब· चा ४ गाई १२ महिनें याप्रमाणें चरल्या तेव्हां ३०० रुपये देणें त्याचा विभाग कोणी किती द्यावा तो सांग·

उत्तर

| | | रु | पा | रे | |
|---|---|---|---|---|---|
| | प. | ५५ .. | १ .. | ६ | $\frac{३०}{११४}$ |
| उत्तर | फ. | ११८ .. | १ .. | ५८ | $\frac{४८}{११४}$ |
| | ब. | १२६ .. | १ .. | २६ | $\frac{३६}{११४}$ |

चवथें कोणी एक किल्ला फौजेनें हल्ला करून घेतला तेसमयीं तेथें १०००० रुपये मिळाले ते फौजेंत दरमहा दरआसामीस २० रुपये ऐसे ४ जमादार ६ महिनें चाकरी करीत होते. व दरमहा दर आसामीस १५ रुपये ऐसे १२ हवालदार ६ महिने चाकरी करित होते. व दरमहा दरआसामीस ११ रुपये ऐसे ११० शिपाई ३ महिने चाकरी करीत होते. पुढें सर्कारचा हुकुम जाला कीं तेरुपये त्या फौजेस आसामी तैनात चाकरीचीमुदत योग्यते प्रमाणें बरोबर द्यावे ह्मणोन त्यास कोणाकोणास किती किती येतात तें सांग.

| रु | पा | रे | | |
|---|---|---|---|---|
| ९२४ .. | २ .. | ४२ | $\frac{१०२०}{५१९०}$ | जमालदार आसामी ४ त्यांचा वांटा. |
| २०८० .. | २ .. | ६९ | $\frac{४८९०}{५१९०}$ | हवालदार आसामी १२ यांचा वांटा. |
| ६९९४ .. | ० .. | ८७ | $\frac{४४७०}{५१९०}$ | शिपाई आसामी ११० यांचा वांटा. |
| १०००० .. | . .. | .. | १०३८०(२ | उत्तर |
| | | | १०३८० | |
| | | | ..... | |

पांचवें

पांचवें चैत्रशुद्ध १ प्रतिपदेस १०००० रुपये भांडवल करून ह· नें व्यापार आरंभिला· नंतर ज्येष्ठशुद्ध १ प्रतिपदेस त्या व्यापारांत १५००० रुपये भांडवल देउन क· सर्कती मिळाला· नंतर भाद्रपद शुद्ध १ प्रतिपदेस त्याच व्यापारांत २८००० रुपये भांडवल देउन ग· सर्कती जाला· याप्रमाणें तिघांचा सर्कती व्यापार चालला पुढें वर्षांतीं हिशेबकर्त्तां १७७६५ रुपये नफा जाला तो भागप्रमाणें तिघांस बरोबर वांटून दे·

| | | रु | पा | रे | |
|---|---|---|---|---|---|
| | ह· चा वांटा | ४५७४ | २ | ७१ | $\frac{११४}{४६६}$ |
| उत्तर | क· चा वांटा | ५७१८ | १ | ३९ | $\frac{२६}{४६६}$ |
| | ग· चा वांटा | ७४७१ | ३ | ८९ | $\frac{३२६}{४६६}$ |
| | | १७७६५ | | | ताळा |

साहावें र· ल· व· यातिघानीं १ वर्ष सर्कतीनें व्यापार केला· त्यांत आरंभींच र· नें २०० रुपये दिल्हे पुढें चारमहिनें जाउन २०० रुपये दिल्हे· तसें ल· नें आरंभीं ३०० रुपये दिल्हे पुढे ३ महिनें गेल्यावर २०० रुपये दिल्हे नंतर ३ महिनें गेल्यावर पुनः ४०० रुपये दिल्हे· तसें व· नें आरंभीं ६०० रुपये

येदिल्हे पुढें ५ महिने गेल्यावर १०० रुपये दिल्हे नं-
तर १ महिना गेल्यावर १०० रुपये माघारे घेतले· या-
प्रमाणें वर्ष पुरें आल्यानंतर हिशेबीं ५०० रुपये न-
फा आला· तो त्यातिघांस भागप्रमाणें बरोबर वां-
टून दे·

| | | रु | पा | रे | |
|---|---|---|---|---|---|
| | र·चावांटा | १०३ | २ | २५ | १२५/१९५ |
| उत्तर | ल·चावांटा | २१० | १ | २ | ११०/१९५ |
| | व·चावांटा | १८६ | ० | ७१ | १५५/१९५ |
| | | ५०० | ० | ० | ताळा |

---

## व्याज·

व्याज ह्मणजे धनकोनाम रिणकोनामास कांहिं रुपये कर्ज देउन त्यारुपयांवर दरमहा किंवा दरवर्षास किंवा कोणत्येही मुदतीस कांहिं रुपये नफा ठरवितो त्या नफ्यास व्याज ह्मणावें· धनकोनाम रिणकोनामास प्रथम जे रुपये कर्ज देतो त्या रुपयांस मुद्दल ह्मणावें· व्याज दोन

प्रकार

प्रकारचें आहे· सरळ व्याज· आणि चक्रवाढ व्याज·

सरळ व्याज ह्मणजे मुद्दल रुपयांस जितकिं वर्षे जालीं तितक्ये वर्षांचें मुद्दलाचें मात्र व्याज करावें· व्याजाचें व्याज नाहिं·

याची रीति·

जर मुद्दल १०० रुपयांचें १ वर्षांत व्याज ४ रुपये किंवा किती देतात तर किती मुद्दल रुपये किती व्याज देतील असा प्रश्न आहे तर त्रिराशि गणित रीती प्रमाणें तपशील करावा ह्मणजे मुद्दलाचें एकवर्षाचें व्याज होईल·

जर १ वर्षाचें किंवा ३६५ दिवसांचें इतकें व्याज होतें तर अमुक वर्षांचें किंवा अमुक दिवसांचें किती व्याज होईल· त्रिराशिगणितरीती प्रमाणें तपशील करावा ह्मणजे किती व्याज होईल तें स्पष्ट समजांत येईल·

उदाहरणें·

प्रथम· मुद्दलरुपये २३०५ याशि व्याज

दर

दरसाल दर शेंकडा रुपये ४ प्रमाणें एक वर्षाचें व्याज किती रुपये होतील तें सांग.

```
जर   मु·रु·   व्या·रु·      मु·रु·
     १००  :   ४     ::    २३०५
                               ४        रु
                   १००)९२२०·०(९२·२
                       ९००           ४
                       ·२२०         ·८
                        २००          १००
                        ·२००    रें  ८००
                         २००
                         ···
       रु·    पा·    रें·
       ९२ ··· ० ·· ८०  एकवर्षाचें व्याज हें उत्तर·
```

दुसरें· मुद्दल रुपये ५४७७ ·· २ पा· याशिव्याज दरसाल दर शेंकडा रुपये ५ प्रमाणें तीन वर्षाचें व्याज किती रुपये होतील तें सांग·

```
जर मु·रु·   व्या·रु·    मु·रु·
    १००  :  ५   ::   ५४७७·५
अथवा २०     १        ५४७७·५
                        १
          २०)५४७७·५००(२७३·८७५ व्याज १ वर्षाचें·
              ४०                 ३
              १४७        रु ८२१·६२५ तीन वर्षाचें·
              १४०                ४
              ··७७       पा २·५००
                ६०                १००
                १७५      रें ५०·०००
                १६०
                ·१५०
                 १४०
                 ·१००
                  १००
                  ···                    उत्तर
```

| रु | पा | रे |
|---|---|---|
| ८२१ .. | २ .. | ५० हें उत्तर. |

तिसरें. मुद्दलरुपये २१०० याशि व्याज दरसा-ल दरशेंकडा रुपये ४½ प्रमाणें ४ वर्षे ७ मास २५ दिवस: याचें व्याज किती रुपये होतील तें सांग.

```
जर मु·रु·   व्या·रु·    मु·रु·
    १००  :  ४·५  ::  २१००
                       ४·५
                     -----
                     १०५००
                     ८४००
                  --------
            १००)९४५००(९४·५        एकवर्षाचें व्याज.
                  ९००       ४
                  ----  ------
                  ·४५०  ३७८·०     चारवर्षांचें
                   ४००   ४७·२५    साहामास
                  ----
                  ·५००   ७·८७५    एकमास
                   ५००   ६·५७२    पंचवीसदिवस
                  ---- --------
                  ···  ४३९·६९७
                               ४
                          -------
                        मा २·७८८
                             १००
                          -------
                        रें ७८·८००
```

जर दि. : व्या.रु. :: दि.

३६५ : ९४.५ :: २५

```
          ९४.५
            २५
        ------
          ४७२५
         १८९०
      ---------
३६५)२३६२.५००(६.४७२
      २१९०
      -----
      ·१७२५
       १४६०
      -----
       ·२६५०
        २५५५
       -----
       ··९५०
         ७३०
        ----
         २२०
```

रु. पा. रें.

४३९ .. २ .. ३८.८ हें उत्तर

## चक्रवाढ व्याज.

चक्रवाढ व्याज ह्मणजे जसें मुद्दलावर व्याज चालतें. तसें व्याजावर व्याज चालतें करारची मुदत सरली ह्मणजे तेथपर्यंत मुद्दलावर व्याज जाहालें असे लतें करोन तें व्याज व मुद्दल एकत्र करावें. आणि त्यावर व्याज चालतें होतें. ह्मणजे व्याजास व्याज आलें.

प्रथमरीति. प्रथम वेळेस मुद्दलाचें व्याज स

रळ

रळ व्याजाचे रीतीप्रमाणें करावें. नंतर तें व्याज व मुद्दल एकत्र मेळवावें. आणि ती बेरीज मुद्दल जाहालें. दुसर्ये वेळेस त्या बेरिजेचें व्याज सरळ व्याजाचे रीतीप्रमाणें करावें. आणि तें व्याज व ती पूर्व बेरीज पुनः एकत्र मेळवावी. जी बेरीज होईल ती पुनः मुद्दल जाहालें. याप्रमाणें वेळचे वेळेस करीत जावें. ह्मणजे चक्रवाढ व्याज होईल.

दुसरी रीति. एक रुपयाचें व्याज पहिले मुदतीस काय जाहालें तें काढावें. आणि त्यांत तो मुद्दल १ रुपया मिळवावा. नंतर त्याचा घन करावा असा कीं ज्याचा प्रकाशक मुदतीचे संख्येचा अंक होईल. मग तो घन मुद्दलानें गुणावा तो गुणाकार रास ह्मणजे व्याजासुद्धां मुद्दल जालें. कदाचित व्याज च हावें तर रासीत मुद्दल वजा करावें बाकी राहील तें व्याज जाहालें.

तिसरी रीति. यांहून थोड्यांत करण्याची आहे परंतु बीजगणिता वांचून समजणार नाहीं. याजकरितां लिहिली नाहीं.

उदाहरणें

## उदाहरणें.

प्रथम १२०० रुपये मुद्दल यास व्याज दर साल दरशेंकडा पांचोत्रा प्रमाणें ४ वर्षांत रास किती होईल तें सांग.

जर मु.रु. व्या.रु. मु.रु.
१०० .. ५ :: १
५
१००)५.००(.०५ एकरुपयाचें १ वर्षाचें व्याज.
१ मुद्दल.
१.०५ रास = व्याजसुद्धां मुद्दल.
१.०५

१.१०२५ वर्ग
१.१०२५

१.२१५५०६२५ चतुर्घन
१२००

२४३१०१२५०
१२१५५०६२५

रु १४५८.६०७५०००
४

पा २.४३०००००
१००

रे ४३.०००००

रु पा रे
रास १४५८ .. २ .. ४३ हें उत्तर
१२००
२५८ .. २ .. ४३ इतकें व्याज हें उत्तर

दुसरें

दुसरें ५०० रुपये मुद्दल व्याज दरसाल दरशे- कडा पांचोत्रा प्रमाणें वर्षें ५ जालीं- रास काय होईल तें सांग.

| | रु | पा | रें |
|---|---|---|---|
| उत्तर | ६३८ | ० | ५६ |

तिसरें ५०० रुपये मुद्दल व्याज वरप्रमाणें वर्षें ५ जालीं- परंतु मुदत अर्धअर्ध वर्षाची तेव्हां १० मुदती जाल्या त्याचीरास काय होईल तें सांग.

| | रु | पा | रें |
|---|---|---|---|
| उत्तर | ८१४ | १ | ७६ |

चौथें उदाहरण पूर्वीचेंच- मुदत ३ तीन म- हिन्याची- तेव्हां २० मुदती जाल्या व्याज काय होई- ल तें सांग.

| | रु | पा | रें |
|---|---|---|---|
| उत्तर | ८९७ | ३ | ७१-२६९२ |

पांचवें ३७०० रुपये मुद्दल- वर्षें ६ जालीं दरसाल दरशेंकडा व्याज ४ रुपयेप्रमाणें रास का- य होईल तें सांग.

| | रु | पा | रें |
|---|---|---|---|
| उत्तर | | | |

साहावें

साहावें ८१०० रुपये मुद्दल वर्षे २$\frac{1}{2}$ जालीं दरसाल दरशेंकडा व्याज ४$\frac{1}{2}$ रुपये प्रमाणें मुदत $\frac{1}{2}$ वर्षाची रास काय होईल तें सांग.

रु पा रें

उत्तर ९८१ .. २ .. ७३

सातवें २१७० रुपये मुद्दल वर्षे २$\frac{1}{4}$ जालीं दरसाल दरशेंकडा व्याज ५ रुपये प्रमाणें मुदत $\frac{1}{4}$ पाववर्षाची रास काय होईल तें सांग.

रु पा रें

उत्तर

---

## इष्टराशि साधन.

इष्टराशि साधन ह्मणजे कित्येक प्रश्नांचीं उत्तरें उघड करायाची एकरीति आहे. किं जा प्रश्नाचीं उत्तरें साधारण पूर्वरीतींकरून उघड होत नाहींत. कोणे वेळेस यारीतीस मिथ्यामनोधृत ह्मणतात. कारण. सत्य संख्येप्रमाणें मनःकल्पित मिथ्या सं-

ख्यानी कामकेल्यापासून शेवटीं सत्यसंख्या उत्पन्न होत्ये. कोणी यारीतीस चुकशोध ह्मणतात. कारण. मिथ्यासंख्यांचे तपशिलानें शोधकरितात. आणि चुक मिळविल्यापासून सत्यसंख्या उत्पन्न होत्ये.

तें एकेरी आणि दुहेरी या भेदेंकरून दोनप्रकारचें आहे.

---

## एकेरी इष्टराशिसाधन.

एकेरी इष्टराशिसाधन तेंच होय. किं जापासून एकच मिथ्या संख्येचे साहाय्यानें प्रश्नाचें उत्तर उघड निघतें. जेंउत्तर त्यांचे मिथ्या संख्येशीं प्रमाणांत आहे. ते प्रश्न एकेरी इष्टराशींतील होत. ह्मणजे असें. इच्छिल्ये संख्येस दुसर्‍यें सांगीतल्ये संख्येनें गुणायाचें किंवा भागायाचें आहे. अथवा. जेव्हां इच्छिली संख्या तिणें तीच अथवा तिचे हरकोणत्ये भागानें कित्येक सांगीतल्या वेळा अधिक किंवा उणी करायाची आहे.

रीति

## रीति·

इच्छिली संख्या काढायाकरितां कोणतीही संख्याघ्यावी· आणि प्रश्नांत सांगीतल्याप्रमाणें तिशीं कामकरावें· नंतर याप्रमाणें प्रमाणराशी कराव्या·

जसें मिथ्या संख्येचें उत्पन्न : त्यामिथ्या संख्येस आहे : : तसें प्रश्नांतील उत्पन्न : त्याचे इच्छिल्ये सत्य संख्येस होईल· ※

## उदाहरणें·

प्रथम· एक मनुष्यानें आपल्ये द्रव्याचा $\frac{१}{३}$ आणि $\frac{१}{४}$ खर्च केला नंतर पाहातो तों ६०० रुपये बाकी राहिले· तेव्हां त्याजवळ पहिलें द्रव्य किती होतें·

पहिलें द्रव्य १२०० रुपये अशी मिथ्यासंख्याघे·
आतां १२०० चा $\frac{१}{३}$ = ४००
आणि १२०० चा $\frac{१}{४}$ = ३००

$$\begin{array}{r} ४०० \\ ३०० \\ \hline ७०० \\ १२०० \\ \hline ५०० \text{ बाकी} \end{array}$$

---

※ यारीतीचें कारण उघड आहे· किं· उत्पन्नें आपआपल्ये संख्यांशीं प्रमाणांत आहेत·

जसें नअ : अ : : नश : श·

अथवा $\frac{अ}{न}$ : अ : : $\frac{श}{न}$ : श·

किंवा $\frac{अ}{न} \pm \frac{अ}{म}$ इत्यादि : अ : : $\frac{श}{न} \pm \frac{श}{म}$ : श·

आणि इत्यादि·

जसें

जसें ५०० : १२०० : : ६०० : १४४० हीइछिलीराशि-

हें उत्तर·

याचाताळा

१४४० चा $\frac{१}{३}$ = ४८०

१४४० चा $\frac{१}{४}$ = ३६०

$\overline{८४०}$

१४४०

$\overline{६००}$ हीबांकीप्रश्नाप्रमाणेंआहे·

दुसरें· तीसंख्या कायआहे· जी ७ याणी गुणू-न तो गुणाकार ६ याणी भागिला असतां भागाकार २१ येईल·

उत्तर १८

तिसरें· तीसंख्या काय आहे· किं जी तिचे अर्धानें तृतीयांशानें आणि चतुर्थांशानें युक्त केली असतां ७५ बेरीज होईल·

उत्तर ३६

चवथें· एकसर्दारानें आपल्ये फोजेचा $\frac{१}{२}$ आणि $\frac{१}{३}$ कहीस पाठविला असतां तळावर १००० मनुष्यें राहिलीं तेव्हां त्या फोजेंत सर्वमनुष्यें किती होतीं·

उत्तर

उत्तर ६००० मनुष्यें

पांचवें· कोणी एक ग्रहस्थानें भीकार्यास ५२ पैसे वांटिले· त्यांत भर्ती केल्या· पुरुषास ६ बायकोस ४ आणि पोरास २ याप्रमाणें आणि त्यांत बायका पुरुषांचे दुपट· आणि पोरें बायकांचे तिपट अशीं होतीं· तेव्हां पुरुष बायका आणि पोरें अशीं त्याजमावांत किती किती होतीं·

उत्तर पुरुष २ बायका ४ आणि पोरें १२

साह्यावें· दोघे भले मनुष्य मार्गांत गोष्टी करित चालिले होते· त्यांत एकानें दुसऱ्यास विचारिलें कीं· तुह्मास वय किती आहे· तेव्हां त्याणें उत्तर केलें कीं माझे वयाचे वर्षांचे $\frac{३}{२}$ सातानीं गुणिले आणि त्या गुणाकारांत त्याच वर्षांचे $\frac{२}{३}$ मेळविलें तर ५७९ होतात· तेव्हां त्याचे वयाचीं किती वर्षें आहेत·

उत्तर ४५ वर्षें

---

## दुहेरी इष्टराशि·

दुहेरी इष्टराशि ह्मणजे किती एक प्रश्नाचीं उत्तरें

त्तरें दोन मिथ्या संख्यांचे साहाय्यानें उघड कराया चीरीति·

दुहेरी इष्टराशींत असे प्रश्न येतात कीं· जांचीं उत्तरें सत्यसंख्या इष्टराशांशीं प्रमाणांत नाहींत· जसें याप्रश्नांत· जांत इछिलीसंख्या त्यासंख्येचा भाग किंवा समगुणाकार यांतून एक प्रकारानें वाढविली· किंवा सांगीतल्ये संख्येनें उणी केली· जी सांगीतली संख्या इछिल्येसंख्येचा कोणता भाग आहे हें ठाउक नाहीं·

## प्रथम रीति·*

सुमारानें कामाचे उपयोगी दोन मिथ्या संख्या घ्याव्या· आणि त्यांशीं प्रश्नाचे संकेताप्रमाणें वेगळालीं एकेरी रीतीप्रमाणें कामें करावीं· नंतर पाहावेंकीं· यादोन संख्यां पासून जीं दोन उत्पन्नें होतील त्यांत आणि प्रश्नास किती भेद आहे· याभेदास अंतर ह्मणतात· तें अंतर अधिक किंवा उणें असेल त्याप्रमाणें त्यास धन (+) ऋण (−) चिन्हें करावीं·

---

* सिद्धांत· यारीतीस आश्रय हा आहेकीं· प्रथम अंतर दुसर्‍ये अं

नंतर

नंतर तीं दोन अंतरें गुणावीं अशीं कि दुसर्यें अंतरानें प्रथम संख्या गुणिली जाईल आणि प्रथम

---

नगम आहे. अशी प्रथम मिथ्यासंख्या आणि प्रथम सत्यसंख्या यांची वजाबाकी. दुसरी मिथ्यासंख्या आणि दुसरी सत्यसंख्या यांचे वजाबाकीस आहे. जेव्हां अशाप्रमाणांत नाहीं. तेव्हां यारीतीनें उत्तर बरोबर काढितां येतनाहीं. हीरीति खरी आहे असें पूर्व आश्रयावरून दाखविलो.

अ आणि ब हीं दोन अक्षरचिन्हें घेतल्ये संख्यांचीं असतील. तसें आ आणि बा हीं त्यांचीं प्रश्नाचे संकेताप्रमाणें उत्पन्नें असतील. तसें र आणि स हीं त्यांचीं अंतरें असतील. ह्मणजे न हें संकेताचें सत्य उत्पन्न. याशीं वेगळाल्या आ आणि बा यांचा वजाबाक्या र आणि स असतील. आणि इष्टसंख्या दाखवायास क्ष घेतला. ह्मणजे क्षचें उत्पन्न न होईल.

तेव्हां न – आ = र आणि न – बा = स अथवा बा – आ = र – स आतां जांस यारीतींचा आश्रय आहे. त्याप्रमाणा प्रमाणें र : स :: क्ष – अ : क्ष – ब. अंत्यपदें आणि मध्यपदें गुणून ह्मणजे रक्ष – रब = सक्ष – सअ नंतर स्थलांतरानें रक्ष – सक्ष = रब – सअ. भागाकारानें क्ष = $\frac{\text{रब} - \text{सअ}}{\text{र} - \text{स}}$ ही इच्छिली संख्या आहे. ह्मणजे हीरीति तेव्हां आहे कि. जेव्हां दोनही अंतरें कमी पडतात.

जर दोनही उत्पन्नें सत्य उत्पन्नाहून अधिक असतील. ह्मणजे आ आणि बा हीं दोनही नहून अधिक अस्तील. तर न – आ = – र आणि न – बा = – स ह्मणजे र आणि स हीं दोनही (–) ऋण आहेत. याजकरितां – र : – स :: क्ष – अ : क्ष – ब. परंतु – र : – स :: + र : + स. याजकरितां र : स :: क्ष – अ : क्ष – ब. आणि सर्व बाकी पूर्वप्रकाराप्रमाणें बरोबर निघेल.

परंतु जर एक उत्पन्न आ कमी आणि दुसरें उत्पन्न बा अधिक असेल. अथवा एक अंतर र (+) धन आणि दुसरें अंतर स (–) ऋण असेल तर पूर्वप्रमाणें प्रमाण राशी करून समीकरणास हें रूप होईल. क्ष = $\frac{\text{रब} + \text{सअ}}{\text{र} + \text{स}}$ आणि हीरीति अंतरें विरूप आहेत तेव्हां उपयोगी होय.

अंतरानें

अंतरानें दुसरीसंख्या· तेव्हां·

जर अंतरांचीं चिन्हें सरूपआहेत· तर वरचे गुणाकारांची वजाबाकी त्या अंतरांचे वजाबाकीनें भागावी· भागाकार येईलतो उत्तर होईल·

परंतु अंतरांचीं चिन्हें विरूप आहेत· तर·उत्तराकरितां वरचे गुणाकारांची बेरीज त्याच अंतरांचे बेरिजेनें भागावी·

टीप· दोन अंतरांचीं चिन्हें धन किंवा ऋण आहेत तर तीं सरूप होत· एक धन आणि एक ऋण अशीं आहेत तर तीं विरूपहोत·

## उदाहरणें·

प्रथम तीसंख्या काय आहे· किं·जी ६ याणीं गुणून त्या गुणाकारांत १८ मेळविले आणि ती बेरीज ९ याणी भागिली· तर भागाकार २० होईल·

आतां

आतां १८ आणि ३० या दोन मिथ्या संख्या सत्य सारिख्या मानून घे·

| प्रथमसंख्या· | | दुसरीसंख्या· | ताळा· |
|---|---|---|---|
| १८ | | ३० | २७ |
| ६ | | ६ | ६ |
| १०८ | | १८० | १६२ |
| १८ | | १८ | १८ |
| ९)१२६ | | ९)१९८ | ९)१८० |
| १४ | ··उत्पन्नें··· | २२ | २० |
| २० | ··सांगितलेंउत्पन्न·· | २० | |
| −६ | ···अंतरें··· | +२ | |
| ३० | | १८ | |
| १८० | | ३६ | |
| ३६ | | | |
| ८)२१६ | गुणाकारांची बेरीज | | |
| २७ | इच्छिलीसंख्या· हेंउत्तर· | | |

## दुसरीरीति·

गणितांच्या तपशील करून इच्छिल्ये संख्येचे अति संनिध दोनसंख्या काढून त्यांशीं प्रश्नाचे संकेताप्रमाणें वेगळालीं कामें करावीं· नंतर जीं उत्पन्नें होतील· तीं अधिक उणीं पाहून त्यांस (+) धन (−) ऋण चिन्हें अनुक्रमें करावीं·

या अतिसंनिध संख्यांची वजाबाकी त्यांतील एक अंतरानें गुणावी· आणि तो गुणाकार त्याअंतरा-

चे

चें वजाबाकीनें भागावा. जरतीं अंतरें सरूप आहेत. आणि विरूप आहेत. तर त्यांचे बेरिजेनें भागावा. अथवा याप्रमाणें प्रमाणराशी कराव्या. जशी दोन अंतरांची वजाबाकी : किंवा दोन उत्पन्नांची वजाबाकी : दोन घेतल्ये अति संन्निध संख्यांचे वजाबाकीस आहे : : तसें कोणतेंही अंतर : तें आपल्ये संख्येचे शुद्धीस होईल.

नंतर तो भागाकार किंवा तें इच्छाफळ आपली संख्या अधिक असल्यास त्यांतून वजा करावें. आणि आपली संख्या उणी असल्यास त्यांत मिळवावें. ह्मणजे इच्छिली संख्या उत्पन्न होईल *

---

* ह्मणजे पूर्वआश्रय सांगीतला त्याप्रमाणें र : स : : क्ष - अ : क्ष - ब. याजकरितां भागाकारानें र - स : स : : ब - अ : क्ष - ब. परंतु बा - आ = र - स याजकरितां बा - आ : स : : ब - अ : क्ष - ब. अथवा बा - आ : ब - अ : : स : क्ष - ब. ह्मणजे ही दुसरी रीति आहे.

## उदाहरणें.

प्रथम. पूर्वउदाहरण आहे तेंच यारीतीनें करावें.

| प्रथमसंख्या. | | दुसरीसंख्या. | |
|---|---|---|---|
| १८ | | ३० यांचीवजाबाकी | १२ |
| | | ल्हानअंतर | २ |
| −६ . . अंतरें . . | +२ | यांचीबेरीज | २४ |
| | | | ३ भागाकार. |

३० याअधिकसंख्येंतून
३ वजाकरून
२७ बाकीइछिलीसंख्या हें उत्तर.

अथवा अशी २२−१४ : ३०−१८ : : किंवा ८ : १२ : : २ : ३ . पूर्वप्रमाणें ३० यासंख्येचे शुद्धीस होईल.

दुसरें. बाप आणि लेंक हे दोघे बोलत होते. तेथे लेंकानें बापास विचारिलें. बापा तुह्मास वय काय आहे. बाप सांगतो. अरे बाळा आज तुझें वय माझे वयाचा $\frac{१}{३}$ आहे. परंतु ५ वर्षां पूर्वीं तुझें वय माझे वयाचा $\frac{१}{४}$ होता तेव्हां त्या दोघांचीं वयें काय आहेत.

उत्तर १५ आणि ४५

तिसरें. कोणी गृहस्थानें प्रतिदिवशीं रुपया १$\frac{१}{२}$ प्रमाणें २० दिवसांचे करारानें एक कारागीर ठेविला. त्याची करारी येणेंप्रमाणें. तो कारागीर जादिवशीं खे-

केल

ळेल किंवा गैरहजीर होईल त्या दिवसांचा त्यापासून उलटा रुपया $\frac{3}{2}$ दंड घ्यावा. पुढें कराराचे दिवस पुरे जाल्यानंतर त्या गृहस्थाकडे त्या कारागीराचे रुपये २२ ठरले. तेव्हां त्याणें किती दिवस काम केलें.

उत्तर १६ दिवस

चवथें. अ आणि ब हे दोघे बरावर समान रुपये घेउन जुगार खेळायास बसले. तों प्रथमच अ रुपये २० जिंकला. नंतर जवळचे सर्व पैक्याचे $\frac{2}{3}$ हारला. शेवटीं खेळ संपून उठले. तेसमयीं ब चेजवळ अचे चौपट पैका जाला. तेव्हां प्रत्येकाजवळ आरंभीं किती किती रुपये होते.

उत्तर १०० रुपये

पांचवें. अ आणि ब या दोघांचा आदाय बरोबर आहे. त्यांत अ आपल्ये आदायाचा $\frac{1}{5}$ संग्रह करितो. परंतु ब प्रतिवर्षी अ पेक्षां ५०० रुपये अधिक खर्च करितो. आणि ४ वर्षांनंतर बला १००० रुपये कर्ज जालें. तेव्हां प्रतिवर्षी एकेकाचा आदाय व खर्च किती तो सांग.

उत्तर

उत्तर १२५० प्रत्येकाचा आदाय. आणि अन्य खर्च वजा केल्यावर १००० रुपये बचत १५०० रुपये.

---

## मिश्रगणित.

मिश्रगणित ह्मणजे वेगळाल्या प्रतींचे शुद्ध पदार्थ एकत्र मिश्र केले. असे कीं. त्या मिश्राची किमत त्यांचे वेगळाल्या किमतींचे मध्यें होईल. ती काढायाचा रीती दोन आहेत. एक मध्यमिश्रगणित आणि दुसरें व्युत्क्रम मिश्र गणित.

## मध्यमिश्रगणित.

मध्यमिश्रगणित ह्मणजे मिश्र पदार्थांचा दर काढायाची रीति आहे. जेव्हां प्रत्येक शुद्ध पदार्थाचे दर आणि परिमाणें सांगितलीं आहेत.

## रीति.

※ प्रत्येक शुद्ध पदार्थांचीं परिमाणें त्यांचे त्यांचे दरानें वेगळालीं गुणावीं. नंतर या सर्व गुणाकारांची बेरीज

---

※ सिद्धांत. या रीतीचा ताळा बीज गणितापासून यापुढील प्रमाणें निघतो. जर अ. ब. क हीं तीन अक्षरें चिन्हें वस्तूंचीं वेगळालीं परिमाणें दाखवायास घे.

द्यावी

घ्यावी· आणि दुसरी शुद्धपदार्थांचे परिमाणांची बेरीज घ्यावी· नंतर प्रथम बेरीज दुसर्‍ये बेरिजेनें भागावी· ह्मणजे गुणाकारांची बेरीज· परिमाणांचे बेरिजेनें भागावी· भागाकार येईल तो त्यामिश्रराशीचा दर परिमाणभाव होईल·

## उदाहरणें·

प्रथम· तीनजातींची शुद्धसाकर एकत्र मिळोन मिश्रराशि जाली आहे· त्यांत ५० शेर दरशेरीं १२ पैसे दराची तसें ४४ शेर दरशेरीं ९ पैसे दराची आणि २६ शेर दरशेरीं ८ पैसे दराची ऐसें वेगळाले भाव होते· आतां त्या मिश्रराशीस दर शेरीं काय भाव

---

आणि म· न· प हीं तीन अक्षरचिन्हें त्यांचे प्रत्येकीं दर दाखवायासये·

तर अम· बन· कप हे त्यातीन्ही राशींचे वेगळाले भाव दाखवायास आहेत·

आणि अम + बन + कप ही त्यावेगळाल्ये राशिपरिमाणांचे मोलांची बेरीज आहे·

पुनः अ + ब + क ही त्यातीनराशींचे वेगळाल्ये परिमाणांची बेरीज आहे·

आतां जर र सर्व मिश्रराशीचा भाव दाखवितो·

तर $\overline{अ + ब + क} \times र$ हीसर्वमिश्रराशीची किमत होईल·

यजकरितां $\overline{अ + ब + क} \times र = अम + बन + कप$

आणि $र = \frac{अम + बन + कप}{अ + ब + क}$

होईल·

होईल.

आतां ५० । ४४ । २६ हें परिमाण आहे.

आणि १२ । ९ । ८ हा भाव आहे.

तर $५० \times १२ = ६००$

$४४ \times ९ = ३९६$

$२६ \times ८ = २०८$

$१२० ) १२०४ ( १० \frac{४}{१२०} = १० \frac{१}{३०}$

उत्तर $१० \frac{१}{३०}$ पैसे हा मिश्रराशीचा दरशेरीं भाव.

दुसरें. तीन जातींचें तूप मण ५ । ० । $१४ \frac{१}{२}$ दर मणीं भाव रुपये १० । $९ \frac{१}{४}$ । $८ \frac{१}{२}$ ऐसें एकत्र केलें त्यामिश्रास दरमणी किती रुपये पडतील.

उत्तर ९ रुपये

तिसरें. तीन जातींचें दूध शेर ४ । ७ । $९ \frac{३}{४}$ दर शेरीं पैसे ६ । ५ । $४ \frac{१}{२}$ ऐसें एकत्र केलें त्यामिश्रास दरशेरीं किती पैसे पडतील.

पै. रे.
उत्तर ४ .. ७.६

चवथें. एक फडयानें तीन प्रकारचे गहुं मण १० । १८ । २० दरमणी रुपये ५ । ३ । २ या भावाचे एकत्र केले तर त्या मिश्रराशीस दरमणी किती रुपये पडतील.

उत्तर ३ रुपये

पांचवें

पांचवें कोणी दुकानदाराने तीन जातींचें गहू मण ३ .४ .५ दरमणी रुपये १ $\frac{३}{४}$ . ३ . २ $\frac{१}{२}$ या दरांचें एकत्र केलें तर त्यामिश्रास दरमणी किती रुपये पडतील.

रु. पा रें
उत्तर २ .. ३ .. ९३.६

साहावें सोनें तोळे ७ , १२ $\frac{१}{२}$ , १७ त्याचे अनुक्रमें कस ९८ , ९६ , ९४ $\frac{१}{२}$ ऐसें एकत्र आटिलें तर त्यामिश्रास कस काय लागेल.

उत्तर ९५ $\frac{५०}{७३}$ कस.

सातवें सोनें तोळे २१ , ३२ , ३९ $\frac{१}{२}$ त्याचे कस ९८ , ९६ , ९५ ऐसें एकत्र आटिलें तर त्यामिश्रास कस काय लागेल.

उत्तर ९६ $\frac{१}{३७}$ कस

आठवें एक चाहा पोंड ५ दर पौंडीं भाव ७ शिलिंग दुसरा चाहा पोंड ९ दर ८ शिलिंग ६ पेन्स आणि तिसरा चाहा पोंड १४ $\frac{१}{२}$ दर ५ शिलिंग १० पेन्स प्रमाणें ऐसा तीन प्रकारचा एकत्र केल्या तर त्यामिश्रास दर पौंडीं भाव काय होईल.

उत्तर

उत्तर ६ शिल्लिंग १० $\frac{1}{2}$ पेन्स·

नववें· एक तेल ग्यालंन ४ दरग्यालंनीं भाव ४ शिल्लिंग १० पेन्स दुसरें तेल ग्यालंन ७ दर पाच शिल्लिंग ३ पेन्स आणि तिसरें तेल ग्यालंन ९ $\frac{3}{4}$ दर ५ शिल्लिंग ८ पेन्स प्रमाणें ऐसें एकत्र केलें तर त्यामिश्रास दर ग्यालंनीं भावकाय होईल·

उत्तर ५ शिल्लिंग ४ $\frac{1}{4}$ पेन्स·

दाहावें· कोणीं फडयानें एकजातीचे गहुं १० बुशिल दर बुशिलीं भाव ५ शिल्लिंग दुसरे गहुं १८ बुशील दर ३ शिल्लिंग आणि तिसरे गहुं २० बुशिल दर २ शिल्लिंग प्रमाणें ऐसे एकत्र केले तर त्यामिश्रास दर बुशिलीं भाव काय होईल·

उत्तर ३ शिल्लिंग·

अकरावें· कोणी दुकान दारानें एकजातीचें पीठ बुशिल ३ दर बुशिलीं भाव ३ शिल्लिंग ५ पेन्स तसें दुसर्यें जातीचें बुशिल ४ दर ५ शिल्लिंग ६ पेन्स आणि तिसर्यें जातीचें बुशील ५ दर ४ शिल्लिंग ८ पेन्स प्रमाणें ऐसें एकत्र करून विकुंलागलातर त्यामिश्र राशीस

शीस दर बुशीलीं काय भाव होईल·

उत्तर ८ शिलिंग ७$\frac{१}{२}$ पेन्स·

बारावें· सोनें ७ औंस २२ क्यारेकट* चांगलें तसें १२$\frac{१}{२}$ औंस २१ क्यारेकट चांगलें आणि १७ औंस १९ क्यारेकट चांगलें ऐसें एकत्र आटिलेंतर त्या मिश्रसोन्यास किती क्यारेकट चांगलें भाव लागेल·

उत्तर २०$\frac{१०}{७३}$ क्यारेकट चांगलें

तेरावें· रुपें ३ पौंड ९ औंस* शुद्ध तसें ५ पौंड ८ औंस यांत १० औंस शुद्ध आणि १ पौंड १० औंस हीण ऐसें एकत्र आटिलेंतर त्यामिश्रास किती औंस शुद्ध

---

* जर १ औंस अथवा दुसरें कोणतेंही सोन्याचें परिमाण भर चांगलें सोनें आहे· तर त्याचे बराबर २४ भाग केले· त्यांस प्रत्येकीं क्यारेकट ह्मणतात· तसें रुप्याचे भागांस औंस ह्मणतात· परंतु बहुतकरून सोनें रुपें या धातू दुसर्ये हीन धातूशीं मिश्र असतात· त्यास हीण ह्मणतात· आणि या मिश्रसोन्यास इतके क्यारेकट चांगलें सोनें ह्मणतात· जसें मिश्रांत चांगलें सोनें आहे·

जसें जर २२ क्यारेकट चांगलें सोनें आणि दोन क्यारेकट हीण तर या मिश्रास २२ क्यारेकट चांगलें सोनें ह्मणतात·

जर मिश्रांत मिळाल्ये वेगळाल्ये पदार्थांत एक हीन दुसर्ये शुद्धांत मिळाला आहे· तर तो हीनपदार्थ अति हलका ह्मणोन त्याचा भाव ० शून्य गणतात·

जसा पाण्याचा भाव ० शून्य होतो· जेव्हां दुधांत मिश्रित जालें· तसा हीणाचा भाव ० शून्य होतो· जेव्हां तें सोनें रुपें इत्यादिक उत्तम धातूंत मिश्रित जालें·

भाव

भाव ... ल.

उत्तर ७ $\frac{६१}{६३}$ औंस शुद्ध.

---

## व्युत्क्रममिश्ररीति.

व्युत्क्रम मिश्ररीति ह्मणजे अनेक सांगीतल्ये भावांचे अनेक शुद्ध पदार्थ एकत्र मिश्र केले. तर त्या मिश्रास सांगीतला भाव व्हावा. तेव्हां मिश्र करायास कोणत्ये भावाचे पदार्थ किती किती परिमाणानें घ्यावे. तें काढायाची रीति आहे. हीरीति मध्यमिश्ररीतीचे उलट आहे. ह्मणोन याचीताळा मध्य मिश्ररीतीनें निघतो.

### प्रथमरीति.※

१ शुद्धपदार्थांचे भाव एकाखालीं एक येतील असे लिहावे — २ इछिल्ये मिश्र भावाहून जे शुद्धपदार्थांचे

---

※ सिद्धांत. उणाभाव अधिकभावास जोडून आणि त्याचा प्रत्येकी इछिल्ये भावांशीं वजा बाक्या त्या त्या भावांसमोर व्युत्क्रमानें लिहून जें परिमाण निघतें. तें असें आहे कि. उण्येभावांचे परिमाणांवर जितका नफा येतो तितकाच अधिक भावांचे परिमाणांवर तोटा आहे. याजकरितां सर्वपरिमाणांवर नफा तोटा होईल. तो बरोबर. हाच इछिलाभाव आहे. याचप्रमाणें अनेक शुद्धपदार्थ मिश्र केले तरी ही जाणावे.

यारीतीनें किती ही शुद्धपदार्थ कित्येक शुद्धपदार्थांशीं जोडिले अ-

भाव

भाव उणे असतील त्यांस प्रत्येकीं मिश्र भावाहून अधिक असतील त्यांशीं अखंड रेघा करून जोडावे· आणि याचरीतीनें प्रत्येक अधिकास प्रत्येक उण्यांशीं मिळवावें· — ३ मिश्र भाव आणि प्रत्येक शुद्ध भाव याच्या वजाबाक्या ह्मणजे अंतरें तीं शुद्ध भाव ज्यांशी जसे मिळविले आहेत· त्यांचे त्यांचे समोर लिहावीं· नंतर एकच वजाबाकी त्या भावाचे समोर आली तर तीच त्या राशीचें परिमाण होईल· आणि अनेक वजाबाक्या आल्या तर त्यांची बेरीज त्या राशीचें परिमाण होईल·

प्रत्येक उदाहरणाच्या ताळा मध्यमिश्ररीतीनें निघतो·

---

सतील ह्मणजे सर्वदा इष्टभावाहून उणे असतील ते अधिकाशीं जोडिले जातील· तरीही प्रत्येक युग्माचा नफा तोटा पूर्वप्रमाणें बराबर होईल· आणि याजकरितां सगळ्यांचा नफा तोटा बरोबर होईल हें सिद्ध·

| | | |
|---|---|---|
| २१ | १६ | ३ |
| | १८ | २ |
| | २३ | ३ |
| | २४ | ५ |

यारीतीपासून कळतें कीं याजातीचे प्रश्नांस अनेक उत्तरें निघतील· कारण· एक उत्तर काढिल्यानंतर इच्छेप्रमाणें हवीं तितकीं यारीतीनें निघतील· तीरीति· वेगळाल्ये काढिल्ये परिमाणांस २ किंवा ३ अथवा ४ इत्यादिकानें गुणून किंवा भागून· याचें कारण उघड आहे· जर दोन शुद्ध पदार्थांचीं परिमाणें मध्यभावाशीं नफा तोटा बराबर करितील· तर त्यांचे दुपटीशीं किंवा तिपटीशींही· याप्रमाणें अनंतपट पर्यंत·

याजातीचे प्रश्नांस बीजगणित जाणणारे अनंतकल्प ह्मणतात· आणि ज्यापासून जितकीं उत्तरें निघतील तितकीं काढायाचा सिद्धांत बीजगणितरीतीनें करितां येतो·

उदाहरणें

## उदाहरणें.

प्रथम. कोणी एक सावकार १६, १८, २२ रुपये खंडी ऐसे तीन जातींचे चणे एकत्र करून मिश्र राशि २० रुपये खंडी या भावानें विकायास इछितो तर त्याणें तीन जातींचे चणे वेगळाले किती किती परिमाणानें घ्यावे ह्मणजे मिश्रराशीस इछिला भाव पडेल.

एथें २० { १६ — २ खंडी १६ चे भावाचे.
१८ — २ खंडी १८ चे भावाचे.
२२ — ४ + २ = ६ खंडी २२ चे भावाचे.

याच्याताळा मध्यमिश्ररीतीनें

| २ | २ | ६ | खंडी हीं परिमाणें. |
|---|---|---|---|
| १६ | १८ | २२ | रुपये हे भाव |

तर २ × १६ = ३२
२ × १८ = ३६
६ × २२ = १३२
खं १० रु २००

दुसरें. कोणी दुकानदार ४ आणि ६ रुपये मण असें दोन भावांचें तेल मिश्र करून ५ रुपये मण याभावानें विकायास इछितो. तर त्याणें मिश्र करायास दोन जातींचें तेल प्रत्येकीं किती किती परिमाणांनें

घ्यावें

घ्यावें·

उत्तर १ खंडी मण किंवा शेर·

तिसरें· कोणी दुकानदार ४ । ६ । ११ पैसे शेर अशी तीन भावांची साकर एकत्र मिश्र करून ७ पैसे शेर या भावानें विकायास इछितो तर त्याणें मिश्र करायास प्रत्येक भावांची साकर किती किती परिमाणानें घ्यावी·

उत्तर १ शेर किंवा मण किंवा खंडी·

चवथें· कोणी दुकानदार दर बुशिल २ शिलिंग ६ पेन्स· ३ शिलिंग ८ पेन्स ४ शिलिंग आणि ४ शिलिंग ८ पेन्स असे चार भावांचे गहुं एकत्र मिश्र करून दर बुशिल ३ शिलिंग १० पेन्स या भावानें विकायास इछितो· तर त्याणें मिश्र करायास कोण कोणातें गहुं किती किती परिमाणानें घ्यावे·

उत्तर २ शि० ६ पे० या दराचे २ बु० । ३ शि० ८ पे० या०चे २ बु० । ४ शि० या०चे ३ बु० । आणि ४ शि० ८ पे० या०चे ३ बुशिल·

पांचवें· कोणी सोनार १६ । १८ । २३ । २४

कारकर

क्यारेकट चांगलें या दरांचें सोनें एकत्र आटून मिश्र सोनें २१ क्यारेकट चांगलें करायास इछितो तर त्याणें कोण कोणतें सोनें किती किती परिमाणानें घ्यावें·

उत्तर १६ क्यारेकटचें ३ भाग । १८ चें २ भाग । २३ चें ३ भा० । आणि २४ चें ५ भाग·

साहावें· कोणी दुकानदार मध १२ रुपये मण । राब १० रुपये मण । काकवी १ रुपया मण आणि पाणी ० रुपये मण· ऐशीं एकत्र मिश्र करून त्या मिश्रास दर मणीं ८ रुपयांचा भाव व्हावा असें इछितो तर त्याणें प्रत्येक काय काय परिमाणानें घ्यावीं·

उत्तर मध १५ राब १५ काकवी ६ आणि पाणी ६ मण·

दुसरी रीति·

जेव्हां मिश्राचें परिमाण सांगीतलें आहे· पूर्वीं सांगीतल्ये जोडण्याचे रीतीं करून उत्तर काढावें· नंतर याप्रमाणें प्रमाण सशी कराव्या· जशी परिमाणांची बेरीज : सांगीतल्ये परिमाणास आहे : : तसे जोडण्याचे रीतीनें काढिलेले शुद्ध पदार्थ : प्रत्येकांचे इछिल्ये परिमाणास होतील·

उदाहरणें

## उदाहरणें·

प्रथम· सोनें १५, १७, १८, २२ क्यारेकट चांगलें एकत्र आटायाचें आहे· असें कीं· तें मिश्र ४० तोळे २० क्यारेकट चांगलें होईल· तर वेगळालें त्या त्या जातीचें किती किती तोळे घ्यावें·

आतां २० { १५ . . . . . . . २
१७ . . . . . . . २
१८ . . . . . . . २
२२ $५ + ३ + २ = \frac{१०}{१६}$ }

जसे १६ : ४० : : २ : ५

१६ : ४० : : १० : २५

उत्तर १५ चें ५। १७ चें ५। १८ चें ५। आणि २२ चे २५ तोळे※

---

※ यास्थळीं धातूंचे स्वभारावर अनेक प्रश्न सांगतां येतील· परंतु· त्यांतून बहुचमत्कारी एकच प्रश्न पुरे·

हेईरो यानामें सेराक्युसचा पात्शाय होता· त्याणें· सगळा शुद्ध सोन्याचा मुकुट सोनारास करायास सांगितला· नंतर· तो· त्याणें करून आणिल्यावर त्यांत कांहीं रुपें किंवा तांबें मिश्र केलें असें नजरेस आलें· परंतु तें किती याचा निश्चय व्हावा ह्मणोन आर्किमीदीज यानामें एक चतुर पुरुष अतिप्रसिद्ध तोही तेथें होता· तेव्हां त्यामुकुटांतील हिणाचें परिमाण काढायास तो त्याचतुर पुरुषाजवळ दिल्हा· पुढें·

त्याणें एक शुद्ध सोन्याची एक तांबें किंवा रुपें याची अशा दोन भरींव आकृती करून त्यापाण्यानें तोंडपर्यंत भरलेल्ये पात्रांत पर्यायानें बुडविल्या· नंतर त्याआकृतींच्या योगें पात्रांतून बाहेर पडिल्ये पाण्याचीं तोलें केल्यापासून त्याभरींव आकृतींचे स्वभार त्यास विदित जाले· ह्मणजे यापासून आणि त्याप्रत्येकांचे सांगितल्ये वजनापासून त्यामुकुटांत शुद्ध सोनें आणि हीण किती होते त्याचें परिमा

दुसरें ४, ५, ६, ८ रुपये मण या च्या र भावांचे तांदुळ एकत्र मिश्र करून ते २० मण ७ रुपयांचे भावानें विकायास इछितो. तर ते वेगळाले किती किती मण घ्यावे.

उत्तर ४ चे २ २/९, ५ चे २ २/९, ६ चे २ २/९ आणि
८ चे १३ १/३ मण

---

ण कांढितां आलें:—

आतां कल्पना कर. कि. त्या भरींव आकृति व मुकुट यांचें प्रत्येक वजन १० शेर आहे. आणि शुद्ध रुपें किंवा तांबें याचे भरींवाकृति मुकुटामुळें पात्रांतून बाहेर पडलें पाणी ९२ शेर आणि शुद्ध सोन्याचे भरींवाकृति मुकुटामुळें पात्रांतून बाहेर पडलें पाणी ५२ शेर आणि त्या मिश्र सोन्याचे मुकुटामुळें पात्रांतून बाहेर पडलें पाणी ६४ शेर. तर त्या मुकुटांतील शुद्ध सोनें आणि हीण यांचें प्रत्येक परिमाण काय होईल.

आतां केवळ तांबें किंवा रुपें याचा भाव ९२ शुद्ध सोन्याचा ५२ आणि मिश्राचा ६४ आहे.

याजकरितां ६४ {५२ / ९२} २८ / १२ आणि यांची बेरीज ह्मणजे

१२ + २८ = ४० परंतु ही १० याची.

याजकरितां रीतीप्रमाणें ४० : १० :: १२ : ३ शेर तांबें.
४० : १० :: २८ : ७ शेर शुद्ध सोनें.

हें उत्तर.

तिसरी

## तिसरी रीति*

जेव्हां एक शुद्ध पदार्थाचें परिमाण अमुक असावें ह्मणून सांगीतलें आहे. तर पूर्वरीती प्रमाणें प्रत्येक पदार्थाचे भावांचा इष्ट भावाशीं वजा बाक्या कराव्या. नंतर याप्रमाणें राशी कराव्या. असें सांगीतल्ये परिमाणाचे शुद्ध पदार्थाची वजा बाकी : दुसर्‍ये वेगळ्ये वेगळ्ये वजा बाक्यांस होत्ये : : तसें सांगीतलें परिमाण : वेगळ्ये वेगळ्ये इछिल्ये परिमाणास होईल.

### उदाहरणें.

प्रथम. दरग्यालन ४ शिलिंग. दरग्यालन ५ शिलिंग. दरग्यालन ५ शिलिंग ६ पेन्स. आणि दरग्यालन ६ शिलिंग असे चार जातीचे पदार्थ मिश्र करायाचे त्यांत प्रथम ४ शिलिंग दरा-

---

* अनेक पदार्थ अमुक अमुक परिमाणाचे असावे असें सांगीतलें असेल तरी ही याच रीतीनें एकाचें परिमाण काढून मग दुसर्‍याचें काढावें. अशा अनुक्रमें सर्वांचीं परिमाणें निघतील. यांत दुसरी आणि तिसरी या रीतींचा आधार सांगायाचें अगत्य नाहीं. कारण. त्या दोनही प्रथम रीती पासून निघतात. तिचा आधार पूर्वीं दाखविला गेला आहे.

ग्या

चा पदार्थ ३ ग्यालंन घालणें आहे. आणि मिश्रास दर ग्यालंनीं ५ शिलिंग ४ पेन्स असा भाव व्हावा तर प्रत्येकांचें परिमाण किती किती घ्यावें.

आतां ६४ { ४८, ६०, ६६, ७२ }

२ + ८ = १०
२ + ८ = १०
१६ + ४ = २०
१६ + ४ = २०

| तरजसे | १० | : | १० | :: | ३ | : | ३ | ग्यालंन |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | १० | : | २० | :: | ३ | : | ६ | ग्या॰ |
| | १० | : | २० | :: | ३ | : | ६ | ग्या॰ |

उत्तर ५ शिलिंगचे ३ ग्यालन. ५ शि॰ ६ पे॰चे ६ ग्या॰. ६ शिलिंगचे ६ ग्या॰

दुसरें कोणी एक वाणी १२, १०, ६, ४ रुपये खंडी दराचे दाणे एकत्र मिश्र करायास इछितो. परंतु त्यांत शेवटील ४ रुपये खंडी दराचे २० खंडी घालायाचे आहेत. आणि त्या मिश्रास ८ रुपये खंडी असा भाव व्हावा तर त्याणें प्रत्येक भावांचे किती किती घ्यावे.

उत्तर ४ रुपयाचे भावाचे २० खंडी. ६ रु॰चे १० खंडी. १० रु॰ १० खंडी. १२ रु॰ २० खं॰

तिसरें

तिसरें १५, १७, १८, २२ क्यारेकट चांगलें सोनें आटून मिश्र करायास इछितो. परंतु त्यांत निसर्ये १८ क्यारेकटचें ५ तोळे घालणें. आणि मिश्र २० क्यारेकट चांगलें व्हावें. तर बाकीचें किती किती तोळे घ्यावें.

उत्तर १५चें ५ तोळे, १७चे ५ तोळे, २२चे २५ तोळे.

## अंग्लेज देशींचें तोलमाप आणि पैकायाचें कोष्टक.

अव्हारडुपाइसवेट ह्मणजे तोल. जाणें सर्व जाडें सामान आणि सोनें रुपें यावांचून सर्व धातू तोलितात.

| | | | |
|---|---|---|---|
| १६ | ड्राम | ह्मणजे | १ औंस. |
| १६ | औंस | = | १ पौंड. |
| २८ | पौंड | = | १ काटर. |
| ४ | काटर | = | १ हंड्रेडवेट. |
| २० | हड्रेडवेट | = | १ टोन. |

| ड्रां | औं | पौं | का | हं | टां |
|---|---|---|---|---|---|
| १६ = | १ | | | | |
| २५६ = | १६ = | १ = | | | |
| ७१६८ = | ४४८ = | २८ = | १ | | |
| २८६७२ = | १७९२ = | ११२ = | ४ = | १ | |
| ५७३४४० = | ३५८४० = | २२४० = | ८० = | २० = | १ |

टीप

## टीप.

| | औं. | पे. | ग्रे. | |
|---|---|---|---|---|
| १ पौंड अवारडुपाइस = | १४ .. | ११ .. | १९ $\frac{१}{२}$ | त्रायवेट. |
| १ औंस ———— = | ० .. | १८ .. | ९ $\frac{१}{२}$ | त्रायवेट. |
| १ ड्रांम ———— = | ० .. | १ .. | ३ $\frac{१}{२}$ | त्रायवेट. |

सोनें रुपें आणि जवाहीर याचे तोलाचें कोष्टक. जांस अंग्लेज देशीं त्रायवेट ह्मणतात.

२४ ग्रेन ह्मणजे १ पेनिवेट.

२० पेनिवेट = १ औंस.

१२ औंस = १ पौंड.

| ग्रे. | पें. | | |
|---|---|---|---|
| २४ = | १ | औं. | |
| ४८० = | २० = | १ | पौं. |
| ५७६० = | २४० = | १२ = | १ |

वैद्यांचे तोलाचें कोष्टक वत्यांचीं चिन्हें. जीं अंग्लेज देशींचे वैद्यलोक लिहितात.

२० ग्रेन ह्मणजे १ स्क्रूपु. ———— ℈

३ स्क्रूप्स = १ ड्रांम. ———— ʒ

८ ड्रांम = १ औंस. ———— ℥

१२ औंस = १ पौंड. ———— ℔

| ग्रे. | स्क्रू. | | | |
|---|---|---|---|---|
| २० = | १ | ड्रां. | | |
| ६० = | ३ = | १ | औं. | |
| ४८० = | २४ = | ८ = | १ | पौं. |
| ५७६० = | २८८ = | ९६ = | १२ = | १ |

मापाचे कोष्टक· जाणें गल्ला लाहान कंद व फळें कोळसे रेती आणि मीठ इत्यादिक मापितात·

| | | |
|---|---|---|
| २ पैंट | ह्मणजे | १ कार्ट· |
| २ कार्ट | = | १ पट्ल· |
| २ पट्ल | = | १ ग्याल्लन· |
| २ ग्याल्लन | = | १ पेक |
| ४ पेक | = | १ बुशाल· |
| ८ बुशाल | = | १ कार्टर· |
| ५ कार्टर | = | १ वे· किंवा· लोड· टोन· |
| २ वे | = | १ लास्त· |

| पैं· | ग्या· | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ८ = | १ | पे· | | | | |
| १६ = | २ = | १ | बु· | | | |
| ६४ = | ८ = | ४ = | १ | का· | | |
| ५१२ = | ६४ = | ३२ = | ८ = | १ | वे· | |
| २५६० = | ३२० = | १६० = | ४० = | ५ = | १ | ला· |
| ५१२० = | ६४० = | ३२० = | ८० = | १० = | २ = | १ |

दूध

दूध तेल वैन इत्यादिक पदार्थ मापायाचे माप कोष्टक.

२ पैंट ह्मणजे १ क्वार्ट.

४ क्वार्ट = १ ग्यालन.

४२ ग्यालन = १ तीर्स.

६३ ग्यालन किंवा. १ $\frac{१}{२}$ तीर्स = १ हागस्हेट.

२ तीर्स = १ पंचन.

२ हागस्हेट = १ पैप किंवा बट्ट.

२ पैप किंवा ४ हागस्हेट = १ टन.

पैं. क्वा.

२ = १ ग्या.

८ = ४ = १ ती.

३६३ = १६८ = ४२ = १ हा.

५०४ = २५२ = ६३ = १ $\frac{१}{२}$ = १ पं.

६७२ = ३६२ = ८४ = २ = १ $\frac{१}{२}$ = १ पै.

१००८ = ५०४ = १२६ = ३ = २ = १ $\frac{१}{२}$ = १ टं.

२०१६ = १००८ = २५२ = ६ = ४ = ३ = २ = १

वस्त्रादि मोजायाचें कोष्टक.

| | | | |
|---|---|---|---|
| २$\frac{१}{४}$ | इंच | ह्मणजे | १ नेल. |
| ४ | नेल | = | १ पावयार्ड. |
| ३ | पावयार्ड | = | १ एल फ्लेमिश. वलंदेजी. |
| ४ | पावयार्ड | = | १ यार्ड. |
| ५ | पावयार्ड | = | १ एल इंग्लिश. |
| ४ पावयार्ड १$\frac{१}{५}$ | इंच | = | १ एल. स्काच. |

पैक्याचें कोष्टक.

| | | |
|---|---|---|
| २ फार्दिङ० | ह्मणजे | १ अर्धपेनी. |
| ४ फार्दिङ० | = | १ पेनी. |
| १२ पेन्स ※ | = | १ शिलिंग. |
| २० शिलिंग | = | १ पौंड. |

※. पेन्स हें पेनी शब्दाचें बहुवचन.

| फा. | | पें. | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ४ | = | १ | | शि. | | |
| ४८ | = | १२ | = | १ | | पौं. |
| ९६० | = | २४० | = | २० | = | १ |

दुसरा भाग समाप्त.

## गणितांतील कामाचे प्रश्न·

प्रथम· तोफेचे गोळ्याचा छोटावेग काळ मानाचे १ सेकंदांत २००० फुट आहे· तर त्याभावानें पृथ्वीपासून सुटलेला गोळा सूर्यमंडळीं पोंचण्यास कितीवेळ लागेल· सूर्य आणि पृथ्वी यांचेमध्यें अंतर १०००००००० मैल असें कल्पिलें· आणि एकवर्ष ह्मणजे ३६५, दिवस ६ अवर·

उत्तर ८ $\frac{४८०८}{१३१४९}$ वर्षे

दुसरा· तोफेचा गोळा बाहेरपडतो तेसमयीं त्याचा वेग १ सेकंदांत १५०० फुट जाण्याचा असतो· आणि सूर्याचा प्रकाश सूर्यापासून पृथ्वीवर पोंचण्यास ७ $\frac{१}{२}$ मिन्युटें लागतात· तेव्हां प्रकाशाचे वेगाचें त्यातोफेचे गोळ्याचे वेगाशीं गुणोत्तर काय आहे·

उत्तरजसें ७८२२२२ $\frac{२}{३}$ : १एकाला·

तिसरा· एक मिन्युटांत ७० पावलें चालतो पाउल ह्मणजे २८ इंच तर याभावानें एक अवरांत कितीचालेल·

उत्तर १ $\frac{१११}{१३२}$ मैल

चवथा

चवथा· एक सेकंदांत २ पावलें अथवा एक मिन्युटांत १२० पावलें चालतो· पाउल ह्मणजे २८ इंच· तर याभावानें कोणी शिपाई कुचकरून चालते समयीं १ अवरांत किती चालेल· आणि एक गणें २० मैल दूर आहे· तेथें त्याच शिपायास पोंचण्यास याभावानें किती वेळ लागेल· मार्गी विश्रांतीस एक अवर अवकाश दिला आहे·

उत्तर { $३\frac{२}{११}$ मैल १ अवरांत चालेल
आणि ७ अ· · १७ $\frac{१}{७}$ मि वेळ लागेल

पांचवा· ७०० यार्ड लांबीची एकभिंत २९ दिवसांत सिद्धकरायाची संकेत· त्यांत १२ माणसांनीं ११ दिवस कामकेलें· तों तीभिंत २२० यार्ड मात्र सिद्धजाली· तेव्हां याभावानें कामचालविणें तर पूर्व संकेताप्रमाणें भिंत पुरी होण्यास पूर्व संख्येहून किती माणसें अधिक असावीं·

उत्तर ४ माणसें पूर्वसंख्येहून अधिक·

साहावा· ५००००००००० रुपये एकाशीं एक लावून एकापुढें एक असे भूमीवर एक सरळ रेषेंत ठेविले· मनांत आणकिं· एकेक रुपयाचा व्यास एकेक इंच आहे· तर तीरुपयांची ओळ किती लांब

ब होईल-

| | मै | या | फु | इं |
|---|---|---|---|---|
| उत्तर | ७८११ | ७२८ | २ | ८ |

सातवा· एक शेताचे भोंवता बांध आहे· त्याची परिमिती ५३६ यार्ड आहे· आणि त्या शेताचे समोरासमोरचे बाजूवर अ आणि ब हे दोघे मनुष्य उभे आहेत· त्यांत अ एक मिन्युटांत ११ यार्ड चालतो- आणि ब तीन मिन्युटांत ३४ यार्ड चालतो· ते दोघे शेतास सव्य प्रदक्षिणा करायास उभे होते तेथून एककाळींच निघाले· तर लवकर चालणाराच्या किती प्रदक्षिणा होतील· तेव्हां पुढील मंद चालणारास मिळवील·

उत्तर १७ प्रदक्षिणा

आठवा· कोणी एकला मनुष्य अ १२ दिवसांत जें काम करितो- आणि तेंच काम दुसरा मनुष्य ब एकला १४ दिवसांत करितो· जर तेंच काम ते दोघे मिळून करितील तर किती दिवस लागतील·

उत्तर ६ ६/१३ दिवस·

नववा· एक तांब्याचे खाणींत एकाचा भाग २/५ आहेत· त्याणें त्यांतून ३/४ एक मनुष्यास १८००० रुपयांस विकले· तेव्हां त्या सगळ्ये खाणीचें मोल

ल काय होईल.

उत्तर ४०००० रुपये.

दाहावा. कोणी एक मनुष्य आपल्ये प्राप्तीचे एक चतुर्थांशाहून २०० रुपये अधीक खर्चकरितो. तथापि त्याचेजवळ प्राप्तीचे अर्धाहून ३०० रुपये अधिक संग्रह राहातो. तेव्हां त्याची सर्वप्राप्ती किती.

उत्तर २००० रुपये.

अकरावा. घड्याळांतील मिन्युट कांटा आणि अबरकांटा हे दोनही १२ अबरांचेस्थानीं एकत्र होते. ते पुनः पुढें केव्हां एकत्र होतील.

१ अबरांत अबरकांटा सर्वपरिघाचा $\frac{१}{१२}$ चालतो. आणि मिन्युटकांटा १ अबरांत सगळा परिघ अथवा $\frac{१२}{१२}$ चालतो.

अ मि से
उत्तर १$\frac{१}{११}$ अबर. किंवा १..५..२७ $\frac{३}{११}$

बारावा. कोणी एक मनुष्याची प्राप्ति एक वर्षाची १५००० रुपये आहेत. आणि एक आठवड्यांत २१० रुपये खर्चकरितो. तेव्हां वर्षांतीं किती रुपये संग्रह किंवा कर्ज होईल. एथें वर्ष विलायतीमानाचें.

उत्तर ४०८० रुपये संग्रह

तेरावा

नेरावा· कोणी एक मनुष्यानें दर पैशास दोन प्रमाणें १८० आंबे विकत घेतले· पुनः दर पैशास तीनप्रमाणें दुसरे १८० आंबे विकत घेतले· नंतर दोन पैशांचे ५ प्रमाणें ते सर्व आंबे विकले· तेव्हां मुद्दलांत नफा किंवा तोटा किति आला तो सांग·

उत्तर ६ पैसे तोटा आला·

चवदावा· दर आसामीस दर दिवशीं दोन शेर प्रमाणें १५०० मनुष्यांस १२ आठवडे पर्यंत पुरेल इतकें अन्न कोठींत आहे· तेंच अन्न दर आसामीस दर दिवशीं १$\frac{१}{२}$ शेर प्रमाणें केल्यास २० आठवडे पर्यंत किती मनुष्यांस पुरेल·

उत्तर १२०० मनुष्यांस·

पंधरावा· लंडन शहराचे ध्रुवोन्नतांत पृथ्वीचे भोंवती त्यास्थळीं ध्रुवोन्नत परिघाची लांबी १५५५० मैल आहे· आणि पृथ्वी आपल्ये आंसावर २३ अवर ५६ मिन्युटांत पश्चिमेकडून पूर्वेकडे प्रदक्षिण एकवार फिरत्ये· तेव्हां याभावानें एक अवरांत फिरण्याचें गमन किती आहे तेंसांग·

उत्तर ६४९ $\frac{२५६}{३५९}$ मैल·

सोळावा· कोणी मनुष्य अंतकाळीं आपलें

सर्व

सर्व द्रव्य पुत्रास देउन आपण मरण पावला. नंतर त्या पुत्रानें त्या द्रव्याचा $\frac{१}{४}$ आठ महिन्यांत खर्च केला. नंतर बाकी राहिल्ये द्रव्याचे $\frac{१}{३}$ बारा महिन्यांत उपजीविकेस खर्च करून हिसाब पाहातो. तों ८२०० रुपये बाकी राहिले. तेव्हां सर्व द्रव्य किती होतें तें सांग.

रु पा रें
उत्तर १९१३३ .. १ .. ३२ सगळें द्रव्य.

सत्रावा. एके किल्यास शत्रूनें फौजेचा वेढा दिला होता त्या किल्यांत १००० मनुष्य होते. त्यांस भक्षायास प्रतिदिवशीं प्रतिमनुष्यास २ शेर प्रमाणें ५ आठवडे पर्यंत पुरेल इतकें अन्न संग्रहीं होतें. तेच समयीं त्याचे कुमकेस ५०० मनुष्य किल्यांत आले. परंतु वेढा उठवाया जोगती कुमक येण्यास ८ आठवड्यांचा अवकाश आहे. तेव्हां तेंच अन्न त्यास वांस तेथपर्यंत पुरविणें प्राप्त. तेव्हां दरमनुष्यास दरदिवशीं किती शेर प्रमाणें द्यावें. तें सांग.

उत्तर ३ $\frac{१}{३}$ पावशेर

अठरावा. कोणी एक मनुष्यानें आपल्ये अंतकाळीं धाकट्ये पुत्रास ८४००० रुपये दिले. हे वडिल पुत्रास जें द्रव्य दिलें त्याचे $\frac{१}{९}$ होतात. तेव्हां त्या मनुष्याचें

नुष्याचें सर्वद्रव्य किती तें सांग.

उत्तर १९२००० सर्वद्रव्य.

एकुणिसावा. कोणीएक मनुष्य घड्याळाचे काटयावर दृष्टी ठेवून बसला होता. त्यास दुसर्यानें विचारिलें. किती अवर आले. तेव्हां तो ह्मणतो. पांचांपासून साहा इतक्यांत आहे. तेसमयीं पुनः त्याणें विचारिलें. किं निश्चय सांग. त्यास त्याणें उत्तर केलें. जे यासमयीं अवरकांटा आणि मिन्युटकांटा हे दोनीं एकत्र आहेत. यावरून समज.

उत्तर २७ $\frac{३}{११}$ मिन्युटें.

विसावा. २० मनुष्यें १२ दिवसांत जें काम करितील त्याचे तिपटकाम पूर्ववेळेचे $\frac{१}{५}$ त करणें तर किती मनुष्यें असावीं.

उत्तर ३०० मनुष्यें.

एकविसावा. कोणी एक मनुष्यानें मरणसमयीं आपल्ये द्रव्याचें $\frac{२}{१८}$ एकपुत्रास देउन जें बाकी राहिलें त्याचे $\frac{३}{१८}$ दुसर्यें पुत्रास दिलें आणि जें बाकी राहिलें तें बायकोस दिलें. पुढें पाहातां त्या दोन पुत्रांचे वांटयांची वजाबाकी ५१४३ रुपये १ पावला २३ रेंस इतकी आहे. तेव्हां बायकोस किती पावलें तें सांग

सांग·

रुं पा रैं

उत्तर १२७०० .. ३ .. ५३

बाविसावा· कोणीमनुष्यानें मरणसमयीं आपल्ये द्रव्याचे $\frac{१३}{२०}$ एकपुत्रास आणि बाकीराहिलें तें दुसर्‍ये पुत्रास असें लिहून मरण पावला· पुढें तेदोघे पुत्र द्रव्य वांटून घेऊंलागले· तों एकास दुसर्‍यापेक्षां १२००० रुपये अधिक आले· तेव्हां सगळेंद्रव्य किती तें सांग·

उत्तर ४०००० रुपये

तेविसावा· मुंबई आणि पुणें यांचेमध्यें अंतर सुमारानें १०० मैल आहे· आतां अ आणि ब हे दोन सांडणीस्वार या दोनस्थळांहून एकदांच निघाले· तेअसें कीं अ मुंबईहून निघाला तो पुण्यास जाणारा· आणि ब पुण्याहून निघाला तो मुंबईस जाणारा· पुढें तेनिघाल्यापासून ७ अवरानीं मार्गीं परस्पर भेटले· तेव्हां असें कळलेंकिं ब पेक्षां अ दरअवरास १$\frac{१}{२}$ मैल अधीक चालिला· तेव्हां यावरून ते उभयतां सांडणीस्वार दर अवरास किती किती मैल चालिले·

उत्तर ७ $\frac{२५}{२८}$ मैल·अ· आणि ६ $\frac{११}{२८}$ मैल· ब·

चोविसावा

चौविसावा· पुणें आणि पंढरपूर यांचेमध्यें अंतर सुमारानें १३० मैल आहे· आतां प्रातःकाळीं आठ अवर वाजतांच पंढरपुराहून अ जासूद निघाला पुण्यास जाणारा· तो दरअवरास ३ मैल चालतो· आणि त्याचदिवशीं सायंकाळीं चार अवर वाजतांच पुण्याहून ब जासूद निघाला पंढरपुरीं जाणारा· तो दरअवरास ४ मैल चालतो· तेव्हां यादोघांची मार्गीं पंढरपुरापासून किती मैलांवर भेटहोईल· तें सांग·

उत्तर पंढरपुरा पासून ६९ $\frac{३}{७}$ मैलांवर·

पंचविसावा· १०० आंबे एकेक यार्डाचे अंतरानें सरळ रेघेंत ठेविले आहेत· आणि प्रथम आंब्यापासून एक यार्डाचे अंतरानें पांटी ठेविली आहे· तेसमयीं एकानें दुसर्यास सांगीतलेंकिं प्रतिखेपेस १ एक आंबा पांटींत ठेवावा· तर अशारीतीनें सर्व आंबे त्या पांटींत येतपर्यंत त्या मनुष्यास किती चालावें लागेल· तें सांग·

उत्तर ५ मै · · १३०० यार्ड·

सव्विसावा· विलायतेंकडेस इतालिया देशांत घड्याळें आहे· तेथे अहोरात्र मिळून एकापासून २४ अवर वाजतात· तेव्हां अवर कांट्याची १ मंदक्षिणा

दक्षिणा होत्ये त्याप्रदक्षिणेंत कितीटोले वाजतात ते सांग.

उत्तर ३०० टोले.

सत्ताविसावा. शेष यानावाचा एक मनुष्य होता. त्याणें आपल्ये बुद्धिबळानें अपूर्व बुदबळांचा खेळ उत्पन्नकरून आपल्ये राजास दाखविला. तेसमयीं तोखेळ पाहून राजा अति संतुष्टजाला. आणि त्याला माग ह्मणाला. तेव्हां त्याणें मागीतलें कीं या बुदबळांचे पटास ६४ कोष्टक आहेत. तर पहिल्ये कोष्टकास १ गहुं दुसर्यास २ तिसर्यास ४ याप्रमाणें प्रतिकोष्टकास दुपटीनें वाढते असे ६४ पर्यंत जेगहुं होतील. त्यांचेंद्रव्य मला द्यावें. तें राजानें मान्यकेलें. तेव्हां जर २००७५ गहुं एक शेरांत राहातील. तर दर मणास दोन रुपयेप्रमाणें त्यासर्व गव्हांचे किती रुपये होतील.

| | रु | पा | रें |
|---|---|---|---|
| उत्तर | ३८२८७१४००४५०५७ | २ | ३८ |

अठ्ठाविसावा. कोणी एक मनुष्यानें प्रतिवर्षी आपले द्रव्याचे $\frac{१}{४}$ पेक्षां १००० रुपये अधीक अशारीतीनें चारवर्षें पर्यंत द्रव्य वाढविलें. पाहातो तों १०३४२१ रुपये ३ पावले ५० रेंस इतकें जालें तेव्हां आरंभीं किती रुपये होते. तें सांग.

उत्तर ४०००० रुपये.

एकुणतिसावा.

एकुणतिसावा. कोणीएक मनुष्यानें ७५०० रुपये कर्ज घेतले. नंतर ७ वर्षांनीं १०१२५ रुपये दिले. इतक्यानें व्याजसुद्धां तें कर्ज फिटलें. तेव्हां दरसाल दरशेंकड्यास व्याजाचा दर काय तो सांग.

उत्तर ५ रुपये.

तिसावा. १०००० रुपये आहेत. ते. अ. ब. क. या तिघांस वांटून द्यावे. ते असेकिं. अला कहून १२०० रुपये अधीक मिळतील. आणि बला कहून ९५० रुपये उणे मिळतील. तेव्हां त्या तिघांत कोणास किती रुपये येतील. सांग.

उत्तर अ ४४५० ब २३०० क ३२५० रुपये.

एकतिसावा. कोणीएक मनुष्याजवळ घड्याळ होतें. त्यास दुसऱ्यानें विचारिलें किं. यावेळेस किती अवर वाजले आहेत. तेव्हां तो सांगतो जे दुपारचे बाराअवर वाजल्यापासून हावेळपर्यंत जो काळ गेला. तो यावेळेपासून रात्रीचे बारावाजत पर्यंत जो काळ जाणार त्याचे $\frac{?}{?}$ आहेत. तेव्हां यावरून बारांवर किती वाजले. सांग.

उत्तर ५ अ २० मिन्युट.

बत्तिसावा. मनांत आणकिं. कोणाएका जवळ

वळ गलबताचे ३/१६ होते त्याची किमत १२००० रुपये. पुढें त्याणें त्यांतून २/९ चे ४/५ विकले. आतां बाकी राहिल्ये भागाचे किती रुपये होतील.

उत्तर ३७/२४० यांची किमत १८५० रुपये.

तेतिसावा. १२०० बिघे जमीन अ. ब. क. या तिघांस वांटून देणें आहे. ती अशी किं. ब ला अ हून १०० बिघे अधिक. आणि क ला ब हून ६४ बिघे अधिक मिळेल. तेव्हां कोणास किती येईल. सांग.

उत्तर अ ला ३१२ ब ला ४१२ क ला ४७६ बिघे.

चौतिसावा. ती संख्या काय आहे. किं. जा संख्येंतून ३/८ चे ३/७ वजाकरून बाकींत ५/१६ चे ८/१५ मिळविले. तर बरावर १० होतील.

उत्तर ९ ७९/८४

पंसतिसावा. एक संख्या अशि आहे किं. त्या संख्येस जर १ १/२ चे ४/५ चे २/३ याणी गुणिलें असतां गुणाकार बराबर १ होईल. त्या संख्येचा वर्ग काय आहे तो सांग.

उत्तर १ ९/१६

छत्तिसावा. ८ १/२ इंच रुंदीचा एक तकता आहे. आणि एक चौरस फुट म्हणजे १२ इंच लांब

आणि

आणि १२ इंच रुंद घेणें आहे. तर त्या तकत्यांतून किती इंच लांब घेतला तर बराबर १ चौरस फुट होईल.

उत्तर १६ [illegible] इंच.

सततिसावा. तें मुद्दल कायआहे. किं ज्यानें व्याज दरसाल दरशेंकडा ५ रुपये प्रमाणें आहे. आणि १ $\frac{१}{२}$ वर्षांत रास १३९१ रुपये १ पावला होत्ये.

उत्तर १३०० रुपये.

अठतिसावा. कोणी गृहस्थानें मरण समयीं आपलें द्रव्य अ. ब. क. यातीन पुत्रांस वांटून दिलें. तें असेंकिं. जेव्हां बला ३ तेव्हां अला ४ आणि जेव्हां बला ६ तेव्हां कला ५ याप्रमाणें. आतां अचा भाग ४०००० रुपये निघाला. तेव्हां सगळें द्रव्य किती सांग.

उत्तर ९५००० रुपये.

एकुणचाळिसावा. एक कुत्रा आणि एक ससा ऐसे एके शेतांत ४० यार्डाचे अंतरानें होते. तों ससा कुत्र्यास पाहून भयानें पळूं लागला. त्यास आरंभीं कुत्र्यानें पाहिलें नव्हतें. परंतु ४० सेकंद गेल्यानंतर पाहिलें. आणि त्यास धरावें या बुद्धीनें त्याचे मागें धावूं लागला. याप्रमाणें दोघे धावूं लागले

गले· त्यांत सशाचे धांवण्याचा वेग १ अवरांत १० मैल· आणि कुत्र्याचे धांवण्याचा वेग १ अवरांत १८ मैल आहे· पुढें कुत्र्यानें त्या सशास धरिलें तेव्हां कुत्रा चालूं लागल्यापासून सशास धरीपर्यंत मध्यें काळ किती गेला· व कुत्रा किती चालिला· तें सांग·

उत्तर ६० $\frac{५}{२२}$ सेकंद आणि ५३० यार्ड·

चाळिसावा· दोन भल्ये मनुष्यांचे पुत्र द्रव्यहीन होते· त्या दोघांस एके सर्कारांत एकसमयींच दोन स्थळीं समान प्राप्तीचे उद्योग मिळाले· तेव्हां त्यांचीं वयें १८ अठरा वर्षांचीं होतीं· त्यांत एक अविवेकी तो आपल्ये प्राप्तीपेक्षां प्रति वर्षीं १०० रुपये अधीक खर्च करि· परंतु त्याचे मनांत लोकांचा पैका बुडवावा हीगोष्ट वाईट ह्मणोन प्रतिवर्षीं त्या अधीक खर्च केल्ये रुपयांचें दरशेंकडा दरवर्षास व्याज रुपये ५ प्रमाणें खत लिहून देउन आपल्ये जीवाचा विमा दरशेंकडा रुपये ६ प्रमाणें करित असे·

आणि दुसरा विवेकी होता· तो प्रतिवर्षीं आपल्ये प्राप्तींतून १०० रुपये संग्रह करून ते दरशेंक-

डा

डा दरसाल व्याज रुपये ५ प्रमाणें वाढवीत असे·

नंतर त्या दोघांचीं ५० पंनास वर्षांचीं वयें झाली· तेव्हां परस्पर भेटले· ते समयीं सर्कारांतून प्रत्येकाची प्राप्ती प्रतिवर्षी ४००० रुपये होती· ते परस्पर गोष्टी करूं लागले· तेथें अविवेक्यानें प्राप्तीपेक्षां अधिक खर्च केला ही आपली चूक पदरीं घेउन निश्चय केला किं· आजपासून जुन्या कर्जाचें व्याज व जीवाचे विम्याचा ऐवज देउन जें प्राप्तीतून बाकी राहील तितक्यांत आपला खर्च चालवीन· आणि विवेक्यानें निश्चय केला किं· आजपर्यंत संग्रह झाला आहे· तितकें मुद्दल राखून त्याचें व्याज व सर्कार संबंधी प्राप्ती हें सर्व खर्च करीन·

आतां पुढें अविवेकीयास प्रतिवर्षी खर्चास किती रुपये राहातात· आणि विवेकी याजवळ किती रुपये संग्रह आहे· व प्रतिवर्षी त्याचा खर्च किती होतो· तो सांग·

| | रु | पा | रें | |
|---|---|---|---|---|
| उत्तर अविवेक्यास प्रतिवर्षी खर्चायास | ६६९ | २ | १६ | राहातात· |
| विवेक्यास प्रतिवर्षी खर्चायास | ४३७६ | १ | ८३ | होतात· |
| आणि याजवळ संग्रह | ७५२९ | २ | ५० | आहे· |

